


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








एप्रिल १९७०
वर्ष २६ वे
मूल्य १॥ रु.



साहित्य • कला • संगम

## श्रे य ना मा व ली



• बर्ट्रॉण्ड रसेल **प्रा. ग. ना. लवंदे** • पलायन माझी ओळख ठेवशील ना — **अनिल थत्ते** • व्यवहारी अपूर्णांक शेवटी पूर्ण झाला कसा ? — **मनोहर शुक्ल** • कॅन्सर इच्छापूर्तीचा हाही मार्ग — **नीलकंठ देशमुख** • लोहगड ते लंडन लोहलंकेचे दर्शन — **ह. सी. उसेंकर** • जिणे न माझे लाजिरवाणे मीही उत्कट प्रेम केलं — **प्रभाकर अत्रे** • प्रस्थापितांविरुद्ध बंड परिसंवाद — **रमेश समर्थ** • फिल्म्स डिव्हिजन कॅमेऱ्याची करामत — **पुरुषोत्तम वावकर** • कशाला भरविता असली प्रदर्शने ? — **चित्रकार वि. सी. गुर्जर** • भारतीय क्रिकेटचे संशोधन क्रिकेटचे व्यवच्छेदन—**बाळ ज. पंडित** शिवाय सन्मान पुष्पे पु. भा. भावे, वि. स. खांडेकर, श्री. ना. पेंडसे आणि ऐसी अक्षरे रसिके.

तसेच

रुणुझुणुती क्षुद्रघंटिका ... **कवि मित्र्यांच्या मंडळाची झलक** — सोपानदेव चौधरी

आणि

**राजकीय आघाडीवरील बोंबाबोंब (शिमगा)**

* **मासिक व्यंगचित्रमाला** *

टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART



संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किंमत १॥ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay—4.








# दीपावली

**दलाल आर्ट स्टुडिओ**
४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४
टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :
३५७७६५ DALALART

● वर्गणीदारांस सूचना दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५ द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी रु. ३० परदेशी वार्षिक वर्गणी रु. २०

● वर्गणी मनिऑर्डरने पाठवावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे बटावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● अंक न पोचल्यास कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● जाहिरातींचा व्यवहार हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

साहित्याच्या स्वीकृतीचा निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.
● स्वीकृत अगर इतर साहित्य गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

---

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. दीनानाथ दलाल यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.


# दीपावलीसंबंधी थोडेसे....

'दीपावली'ने गेल्याच अंकाबरोबर सव्विसाव्या वर्षांत पदार्पण केल्याबद्दल अनेक सुहृदांनी आणि हितचिंतकांनी समक्ष आणि पत्रद्वारे अभिनंदन केले याबद्दल त्या सर्वांना धन्यवाद ! 'दीपावली'च्या प्रथेप्रमाणे यंदाही वर्षारंभानिमित्त विनोदप्रधान विशेषांक प्रसिद्ध केला, त्याबद्दलही अनेकांनी पत्रे पाठवन पसंतीची पावती दिली आहे.

'दीपावली'च्या पहिल्या अंकापासूनचे लेखक आणि 'दीपावली' वरील अकृत्रिम लोभामुळे 'दीपावली'च्या कुटुंबातच समाविष्ट झालेले ख्यातनाम साहित्यिक श्री. पु. भा. भावे यांच्या वयाला साठ वर्षे पूर्ण होऊन त्यांनी एकसष्टाव्या वर्षात पदार्पण केले आहे, त्याबद्दल याच अंकात त्यांना 'सन्मानपुष्प' देऊन 'दीपावली'ने त्यांचे अभीष्टचिंतन केले आहे. वास्तविक या निमित्ताने त्यांच्यावर एक खास लेख 'दीपावली'त प्रसिद्ध करण्याचे आम्ही ठरविले होते आणि श्री. भावे यांचे मित्र 'महाराष्ट्र टाइम्स'चे संपादक श्री. गोविंदराव तळवलकर यांना लेख लिहिण्याची विनंती केली होती. श्री. तळवलकर यांनी ती मान्यही केली होती; 'दीपावली'च्या मार्चच्या अंकात तशी जाहिरातही प्रसिद्ध झालेली आहे. पण अशा तऱ्हेचे उपचार श्री. भावे यांना मान्य नसल्याने त्यांनी अशा प्रकारचा लेख येऊ नये असे स्पष्टपणे बजावले.

श्री. भावे यांनी आपल्या पत्रात म्हटले आहे की "माझ्यासंबंधी लेख प्रसिद्ध करणे हे तुमच्या मित्रभावनेला योग्य असेच आहे; परंतु साठी-एकसष्टीची कसलीही प्रसिद्धी मला नको आहे. ह्या गोष्टीची मी नेहेमी थट्टा केली आहे. तीच गोष्ट स्वतः करण्याइतका मी मोठा म्हणून रागावू नये, क्षमा असावी. फार मोठ्या माणसांची साठी प्रकटपणे साजरी करणे ठीक आहे. अन्य माणसांनी घरात काय धार्मिक विधी करायचे ते करून गप्प बसावे. तुम्ही स्वतः व 'दीपावली' यांच्याविषयी पूर्ण प्रेम बाळगूनच हे मी लिहिले आहे." श्री. भावे यांच्या भावनेला मान देऊन आम्ही त्यांच्यावरील लेख प्रसिद्ध केला नाही.

या अंकातील 'आमचेही (एक) मत' या सदरातील एका रसिक वाचकाच्या पत्रासंबंधी खुलासा करावयाचा आहे. 'दीपावली' मासिकाच्या दर महिन्याच्या अंकावर जुनीच चित्रे छापली जातात याबद्दल त्यांनी तक्रार केली आहे. आजकाल चित्रांचे मुद्रण-ठसे (ब्लॉक्स) करवून घेणे हे अतिशय खर्चाचे काम झाले आहे. त्यामुळे दर महिन्याच्या अंकाच्या मुखपृष्ठासाठी प्रत्येक वेळी नवे चित्र छापणे परवडण्यासारखे नाही. 'दीपावली'तील काही चित्रे विशेष आवडल्याची वाचकांची पत्रे येतात, तेव्हा अशीच चित्रे आम्ही दर महिन्याच्या मुखपृष्ठासाठी निवडून छापीत असतो. कुणाचा गैरसमज राहू नये म्हणून हा प्रगट खुलासा !

'दीपावली'चा पुढील म्हणजे मे महिन्याचा अंक हा पाचवा संगीत विशेषांक म्हणून प्रसिद्ध होत आहे, याकडे आम्ही वाचकांचे लक्ष वेधू इच्छितो. यापूर्वी 'दीपावली'ने चार संगीत विशेषांक प्रसिद्ध केले आहेत त्यांना संगीत विश्वातील लहानथोर जाणकारांनी मनापासून दाद दिली आहे आणि रसिकांनी मुक्तकंठाने कौतुक केले आहे हे अभिमानपूर्वक नमूद करावेसे वाटते. या वर्षीच्या संगीत विशेषांकाचेही रसिकवर्गाकडून नेहेमीप्रमाणे स्वागत होईल अशी खात्री वाटते. यंदाच्या मे महिन्यात महाराष्ट्र-राज्य स्थापनेला दहा वर्षे पूर्ण होत असून महाराष्ट्रात हा दहावा वर्धापन-दिन ठिकठिकाणी साजरा होणार आहे. त्याच सुमाराला 'दीपावली'चा संगीत विशेषांक प्रसिद्ध होत असल्याने महाराष्ट्रीयांच्या आनंदात या अंकाने भरच पडेल असा आम्हांला विश्वास वाटतो.

—संपादक



अनुक्रमणिका

## उल्लेख आवश्यक होता

स. न. वि. वि.

मार्चच्या अंकातील पत्रे पाहिली. डॉ. पु. ग. वर्तक यांच्या पत्रातील प्रत्येक शब्दाशी मी सहमत आहे

उल्लेख आवश्यक होता. दिवाळीच्या घाईगर्दीत राहून गेला. मी 'दीपावली'तली गोष्ट वाचली नव्हती हेही तितकेच खरे.

मुंबई-५२. आपला

२८-२-७० **वसन्त सबनीस**

## वाङ्मयचौर्याचे हे समर्थन

स. न. वि. वि.

मार्च '७० चा अंक चाळला. पत्रांच्या सदरातील डॉ. पु. ग. वर्तक आणि श्री. प्रभाकर तुंगेकर यांच्या पत्रावर थोडेसे लिहावेसे वाटते.

प्रभाकर तुंगेकर यांनी श्री. वसंत सबनीसांवर वाङ्मयचौर्याचा केलेला आरोप मला मान्य नाही. 'हम सब चोर हैं' म्हणून साऱ्या प्रसिद्ध आणि अप्रसिद्ध लेखकांवर आरोप केलेला आहे. आरोप त्यांनी मागे घ्यावे. डॉ. पु. ग. वर्तक यांच्या पत्राला माझे अनुमोदन आहे.

दोन लेखक अथवा कवी एखाद्या घटनास्थळी अथवा सूर्योदयाच्या वेळी एकत्र येतात आणि दोन्ही लेखक त्या घटनेचे वर्णन अथवा दोन्ही कवी सूर्योदयाचे वर्णन आपापल्या भाषेत सजविल्यास त्यांनी एकमेकांची चोरी केली असे नव्हे.

वाङ्मचौर्य हे ते लोक करतात, ज्यांना कल्पना सुचतात परंतु कल्पनांचा विस्तार करण्यासाठी बुद्धीची हवी तेवढी वाढ झालेली नसते तेव्हा ते इथून थोडं तिथून थोडं असं उचलेगिरी करून कथा तयार करतात तेव्हाच ते वाङ्मयचौर्य म्हणता येईल. साहित्यात कसलेल्यांना चोरीची गरजच नसते म्हणून श्री तुंगेकरांनी पुन्हा विचार न करता धडधडीत आरोप करू नये.

सोलापूर-२ आपला,

१०-३-७० **एल. एस. बाबानगरे**

## क्षुद्रघंटिकेचा मधुर ध्वनी

स. न. वि. वि.

मार्चच्या वर्षारंभ अंकात कविवर्य सोपानदेव चौधरी यांचे नवे सदर 'रुणुझुणुती क्षुद्रघंटिका' पाहून आनंद वाटला. या सदरातून सोपानदेवांच्या आठवणींचे गंमतीदार किस्से वाचायला मिळतील अशी अपेक्षा आहे.

श्री. प्रभाकर पेंढारकर यांच्या कादंबरीचा उत्तरार्धही बहारीचा वाटला. श्री. पेंढारकर हे लौकरच नामवंत कादंबरीकारांच्या पंक्तीत बसतील असे 'आज अचानक गांठ पडे'वरून म्हणता येईल. पेंढारकरांची 'दीपावली'तून पुनः पुन्हा गांठ पडावी—अचानक असली तरी चालेल —अशी मनापासून इच्छा !

पूर्वी 'कानडीने केला मराठी भ्रतार' याबाबतची परंपरागत कथा ऐकून होतो; पण सौ. कवली या मराठी महिलेने कानडी भ्रताराचे दर्शन इतके छान केले आहे की ही एखादी सत्यकथाच असावी असे वाटत राहाते. श्री. ह. शि. खरात यांची 'बाटलीबाई आणि मंडळी' ही एकांकिकाही मजेदार वाटली. श्री. श्रीराम गुळवणे यांची 'मोफत सर्व्हिस' लाजवाब आहे.

एकंदरीत आपला हा वर्षारंभ विशेषांक विनोदी साहित्याने भरलेला आहे आणि विनोदी साहित्याची निवड अत्यंत चोखंदळपणाने केलेली असल्याने तो वाचनीय झाला आहे.

सव्विसाव्या वर्षात पदार्पण करणाऱ्या 'दीपावली'चे मनःपूर्वक अभिनंदन !

पालघर आपला

८-३-७० **रघुनाथ सदावर्ते**

## आम्हाला नवीन चित्रे हवीत

स. न. वि. वि.

मला आताच मार्च १९७० चा अंक मिळाला. पुढे काय होणार ह्या उत्सुकतेने भरलेला असा मी प्रभाकर पेंढारकरांची कादंबरी संपविण्यास उत्सुक झालो होतो. फार छान ! कानडी-मराठी गोंधळ—मजा वाटली. राजा राजवाड्यांची कथा खुमासदार. सगळा अंक मस्त ! पण एकच गोष्ट खटकली, ती म्हणजे 'दीपावली'च्या मुख पृष्ठावरील चित्रे नवनवीन असावीत. आपल्या नव्या चित्रांसाठी हपापलेले आहोत.

कोल्हापूर आपला

२८-२-७० **एक वाचक**

# आमचेंही (एक) मत

## नजर चुकीचा नजराणा

## अरे माईका

'दीपावली'च्या मार्च अंकात 'रुणुझुणुती क्षुद्रघंटिका' या श्री. सोपानदेव चौधरी यांच्या सदरात शेवटी अरे माईका ही कविता संपूर्ण दिली आहे. त्यात 'कवितेतील अधोरेखांकित ओळी मर्ढेकरांच्या व बाकीच्या माझ्या (म्हणजे चौधरींच्या) आहेत' असे म्हटले आहे, पण नजरचुकीने मर्ढेकरांच्या ओळींच्या खाली रेषा देण्याचे राहून गेले. म्हणून ती कविता योग्य दुरुस्तीसह येथे पुन्हा उद्धृत केली आहे :—

अरे माइका तऱ्हेवाईका
घावरली गायिका
काहि का तुला दया नाहि का ?
त्या लाल दिव्याने
लालिलाल जाहली
घटिकांना स्मरता
ताल चुकू लागली
अन् साजिंद्याची
चाल भरू लागली
अखेरीस मग सरले गाणे
सुटला मर्ढेकर
देउनी समाधानि ढेकर

—संपादक

# बर्ट्रांड रसेल

डॉ. प्रा. ग. ना. लवंदे

नुकतेच दिवंगत झालेले जागतिक कीर्तीचे ब्रिटीश तत्त्वज्ञ बर्ट्रांड रसेल यांच्या तत्त्वज्ञानाचा अल्पसा परिचय मराठी वाचकांना करून देणे हा या लेखाचा हेतू आहे. रसेलच्या निधनानंतर मराठीत रसेलवर बरेच लिखाण प्रसिद्ध झालेले आहे. परंतु ते बहुशः रसेलच्या तत्त्वज्ञानासंबंधी नसून इतर अवांतर गोष्टींसंबंधी आहे. रसेलच्या लहानपणात घडलेले काही गंमतीदार प्रसंग, मोठेपणात त्यांचा अनेक स्त्रियांशी आलेला संबंध, त्यांची राजकीय व सामाजिक मते या सर्व गोष्टींचे बरेचसे चर्वितचर्वण मी मराठीत पाहिले आहे. मला स्वतःला रसेलच्या आयुष्यातल्या असल्या तकलादू गोष्टींसंबंधी फारसे आकर्षण नाही. रसेलचे नाव इतिहासात जर कायमचे राहाणार असेल तर ते केवळ त्याच्या तत्त्वज्ञानामुळे. तत्त्वज्ञानात व त्यातल्यात्यात तर्कशास्त्रात रसेलने केलेले कार्य हेच त्याचे खरें कार्य; परंतु या त्याच्या कार्याची ओळख मराठी वाचकांना फारशी आहे असे मला वाटत नाही. निदान रसेलवर जे आजपावेतो मराठीत लिखाण प्रसिद्ध झालेले आहे त्यावरून तरी वाटत नाही. अशा परिस्थितीत 'दीपावली'च्या संपादकांनी जेव्हा मला रसेलच्या तत्त्वज्ञानावर लिहिण्याची सूचना, नव्हे आग्रह, केला तेव्हा ती त्यांची सूचना मी आनंदाने नव्हे तर केवळ त्यांच्या आग्रहाला बळी पडून मान्य केली. त्याचे कारण असे की पाश्चात्य तत्त्वज्ञान भारतीय तत्त्वज्ञानाच्या चौकटीत बसवणे अगदी अशक्य आहे. पाश्चात्य तत्त्वज्ञानाची भूमिका व भारतीय तत्त्वज्ञानाची भूमिका या अगदी भिन्न आहेत. रसेलचे तत्त्वज्ञान मराठीत आणणे म्हणजे भारतीय तत्त्वज्ञानाच्या चौकटीत पाश्चात्य तत्त्वज्ञान (व तेसुद्धा बऱ्याचशा अर्थीने क्रांतिकारक) बसविण्याचा अट्टाहास करण्यासारखे आहे. रसेलच्या बऱ्याचशा कल्पनांना मराठीत प्रतिशब्द तयार करणे अशक्य आहे. इंग्रजी शब्दांचा अनिर्बंध उपयोग केला तर लेख घेड-



(टाईम्स ऑफ इंडियांत प्रसिद्ध झालेल्या श्री. आर. के. लक्ष्मण यांच्या व्यंगचित्रावर आधारलेले स्केच.)

गुजरी होण्याची भीती असते. तेव्हा अशा परिस्थितीत या माझ्या लेखामुळे रसेलच्या तत्वज्ञानाची ओळख मराठी वाचकांना कितपत होईल याबद्दल मी साशंक आहे. केवळ माझे मित्र श्री. दलाल यांच्या आग्रहामुळे मी हा प्रयत्न करून पाहाणार आहे. वाचकांना एवढी सूचना सुरवातीस देणे हे मी माझे कर्तव्य समजतो.

## निर्भेळ सत्य व इतर सत्ये

लहानपणापासून रसेलची अशी धारणा होती की मानवाने जर प्रयत्न केला तर त्याला निर्भेळ सत्य (absolute truth) गवसणे अशक्य नाही, निर्भेळ सत्य याचा अर्थ असा की ते जाणून घ्यायला दुसऱ्या कुठल्याही गृहीततत्वांची (hypotheses) आवश्यकता नाही. निर्भेळ सत्य हे स्वतंत्र असते व ते दुसऱ्या कोणत्याही अनुमानावर अवलंबून नसते. या निर्भेळ सत्याच्या कल्पनेने बऱ्याच तत्त्वज्ञान्यांना भुरळ घातली आहे. उदाहरण द्यायचे तर प्लेटो याचे. आपल्या Republic या संवादात प्लेटोने Dialectics ची जी कल्पना मांडली आहे ती एवढ्याच करता की निर्भेळ सत्य व इतर सत्ये यातला विरोध स्पष्ट व्हावा. तत्वज्ञानाला निर्भेळ सत्य गवसण्याची शक्यता असते; परंतु ज्ञानाच्या इतर शाखात काम करणाऱ्यांना ती शक्यता नसते हे प्लेटोला या विरोधाने दाखवायचे होते. इतर शास्त्रे, उदाहरणार्थ

**जागतिक कीर्तीचे ब्रिटीश तत्त्वज्ञ बर्ट्रांण्ड रसेल नुकतेच परलोकवासी झाले. डॉ. मा. ग. ना. नवंदे यांनी आपल्या सकस लेखणीने रसेलच्या महान् तत्त्वज्ञानाचा मराठी वाचकांना सोप्या भाषेत करुन दिलेला हा प्रभावी परिचय.......**

गणितशास्त्र व भौतिकशास्त्रे ही कुठल्या तरी गृहीततत्वांच्या आधारावर उभी असतात. या शास्त्रांचा वस्तुस्थितीशी Facts शी संबंध असतो अशी सर्वसाधारण समजूत आहे. परंतु प्लेटोच्या म्हणण्याप्रमाणे ती चूक आहे. तत्त्वज्ञानाशिवाय इतर कोणालाही निर्भेळ वस्तुस्थितीनिष्ठ सत्य गवसणे शक्य नसते. तत्वज्ञानाचे किंवा प्लेटोच्या भाषेत सांगावयाचे झाल्यास Dialectics चे महत्त्वाचे कार्य म्हणजे जी गृहीततत्वे इतर शास्त्रे अंगभूत समजतात त्या शास्त्रांच्या मर्यादा (destruction of the hypotheses) स्पष्ट करणे व असे करणे हे केवळ तत्त्वज्ञान्यालाच शक्य आहे. याचे कारण असे की केवळ तत्वज्ञान्यालाच निर्भेळ सत्य 'Idea of the good' कळण्याची शक्यता असते. इतरांना नाही. आपणाला अंतिम व निर्भेळ सत्य गवसायाला पाहिजे ही लहानपणच्या रसेलची महत्त्वाकांक्षा त्याला केंब्रिजमध्ये गेल्यावरसुद्धा चैन पडू देईना. रसेलने परीक्षेकरता, ट्रायपॉसकरता, गणित हा विषय घेतला होता; परंतु त्यावेळी कदाचित अजूनसुद्धा गणित शिकणे वा शिकवणे म्हणजे गणितातली उदाहरणे सोडवणे असाच होता. आपल्याकडेसुद्धा हीच परिस्थिती आहे. गणिताचा उत्कृष्ट शिक्षक कोण तर जो गणितातली उदाहरणे कमी वेळात व बिनचूक सोडवतो तो; परंतु रसेलला केवळ गणितातली 'उदाहरणे' सोडवण्यात रस नव्हता. त्याला गणित शास्त्राची मूलतत्वे समजून घेण्याचा हव्यास होता. परंतु नेमकी हीच गोष्ट त्याला केंब्रिजमध्ये त्याच्या शिक्षकांकडून हस्तगत होईना. केवळ तत्वज्ञानाशिवाय या मूलभूत तत्वांचे ज्ञान आपणास मिळणे शक्य नाही हे रसेलला कळून चुकले व त्या दिशेने त्याचे प्रयत्न चालू राहिले; परंतु गणित व तत्वज्ञान या दोन्ही विषयांचा अभ्यास एकसमयावच्छेदे करणे रसेलला जमेना. त्याच्या गणिताच्या अभ्यासाची प्रगती खुंटली. शेवटी James Ward या प्रख्यात तत्त्वज्ञानाच्या प्राध्यापकाने रसेलला सल्ला दिला की रसेलने आपली रँग्लरची परीक्षा पास व्हावी व तदनंतर तत्वज्ञानाकडे आपली दृष्टी वळवावी. Wrangle is a wrangler हे Ward चे सुप्रसिद्ध वाक्य ऐकून रसेलने गणिताच्या परीक्षेकरता आपली शक्ती वळवली. परंतु परीक्षेत त्याला म्हणण्यासारखे यश आले नाही. रसेलचा सातवा क्रमांक आला. रसेलला त्याचे विशेष काही वाटले नाही. परंतु गणितशास्त्र गृहिततत्वांवर आधारलेले आहे व त्यामुळे गणित शास्त्रापासून आपणास निर्भेळ व अंतिम सत्य मिळणे शक्य नाही याची रसेलला खात्री पटली. परिणाम असा झाला की रसेलने परीक्षा आटोपल्यावर आपली गणिताची सर्व पुस्तके विकून टाकली व इतःपर गणिताकडे ढुंकूनही पाहायचे नाही असा निश्चय केला व स्वारी तत्वज्ञानाच्या अभ्यासाकडे वळली. ज्या काळात रसेलने तत्वज्ञानाच्या अभ्यासास सुरवात केली त्यावेळी इंग्लंडमध्ये Absolute Idealism या संप्रदायाचा जबरदस्त प्रभाव होता. या संप्रदायाचा मूळ जनक जरी प्लेटो असला तरी आधुनिक काळात त्या सांप्रदायाचा विस्तार करण्यात हेगेल हा बव्हंशी कारणीभूत होता. रसेलचा तत्त्वज्ञानाचा शिक्षक J. E. Mactaggart हा होता व Mactaggart ने आपली सर्व हयात हेगेलच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास करण्यात घालवली होती. त्याच काळात ब्रिटिश तत्त्वज्ञानातले अत्यंत श्रेष्ठ असे तत्त्वज्ञ ऑक्सफर्डचे F. H. Bradley यांचा Appearance and Reality हा ग्रंथ प्रसिद्ध झालेला होता. ब्रॅड्लेच्या या ग्रंथाने इंग्लीश तत्त्वज्ञानात प्रचंड क्रांती घडवून आणली होती. इंग्लीश तत्त्वज्ञानाची परंपरा ही Locke, Berkley, Hume, Mill या अनुभववादी तत्त्वज्ञान्यांची परंपरा. अनुभव याचा हे तत्वज्ञांनी संवेदना असा अर्थ लावीत असत. ब्रॅडलेने या परंपरेला जबरदस्त तडाखा दिला. अगोदरच आपल्या तर्कशास्त्रावरील ग्रंथात या परंपरेला त्यांनी आव्हान दिलेले होते व आता तर ती घरची इंग्लीश परंपरेची इमारत ब्रॅडलेने जमीनदोस्त केली होती. ब्रॅडले हासुद्धा हेगेलच्या परंपरेत वाढलेला, परंतु तो स्वतंत्र प्रज्ञेचा होता. तो केवळ हेगेलचा अनुयायी नव्हता. काहीही असले तरी या संप्रदायाची बैठक रसेलच्या प्रकृतीशी जुळणारी नव्हती. रसेल व त्याचा मित्र मूर (G. E. Moore) हे दोघेही ब्रॅड्लेच्या तत्वज्ञानाने प्रभावित झाले होते खरे; परंतु या मित्रद्वयांची मानसिक बैठकच अशी होती की ते हेगेलच्या संप्रदायाशी चिकटून राहाणे शक्यच नव्हते. व झालेही तसेच. अल्पावधीतच रसेलने आपला व हेगेल व ब्रॅडले यांच्या संप्रदायाचा संबंध तोडून टाकला. हे पाऊल उचलण्यात मूरनेच रसेलला मदत केली होती असे रसेलने कृतज्ञतापूर्वक नमूद केले आहे. मूरबद्दल रसेलने वेळोवेळी आपली कृतज्ञता व्यक्त केली आहे. असो.

### तत्वज्ञानाची दिशा निश्चित झाली

याच सुमारास रसेलला Leiboniz या थोर तत्वज्ञान्यावर विद्यापीठात व्याख्याने देण्याचा योग आला. त्याचे गुरु मॅक्टेगर्ट हे वास्तविक ही व्याख्याने देणार होते परंतु ते रजेवर जात होते व हे काम रसेलकडे देण्यात आले होते. रसेलने या तत्त्वज्ञान्याचे उपलब्ध ग्रंथ तपासून त्यावर एक स्वतंत्र ग्रंथ लिहिला. लायब्नीजच्या तत्वज्ञानाच्या अभ्यासामुळे रसेलच्या तत्वज्ञानाला एक प्रकारची धार आली. अगोदरच रसेल ब्रॅड्लेच्या तत्त्वज्ञानापासून दूर जात होता. लायब्नीजच्या अभ्यासामुळे त्याच्या तत्त्वज्ञानाची दिशा निश्चित झाली व तदनंतर एका विशिष्ट बाबीपुरता तरी त्यात बदल झाला नाही. त्याचे असे झाले, अरिस्टॉटलच्या तर्कशास्त्रापासून संप्रदाय असा चालत आला होता की प्रत्येक वाक्याची अंतिम रचना (Form) वर स्पष्ट केल्याप्रमाणे








झाली, तर त्या रचनेत संबंध (Relations) या प्रकाराला स्थान नव्हते. कर्ता व कर्म यावरच ही रचना आधारलेली होती. समजा अ बवर प्रेम करतो असे वाक्य आहे. तर हे वाक्य कर्ता व कर्म यावरच भागवून नेण्यात येत असे. A loves B याची तर्कशास्त्रदृष्ट्या सुसंगत रचना म्हणजे A is a lover of B यात loves या संबंधाला (relation) स्थान नव्हते. रसेलला ही गोष्ट खटकली. लायब्नीजच्या तत्वज्ञानात Relation या गोष्टीवर भर दिला नसल्यामुळे ते सर्व तत्त्वज्ञान चुकीच्या पायावर आधारलेले आहे असे रसेलचे मत बनले. ब्रॅडलेनेसुद्धा Relation हा स्वतंत्र प्रकार मानला नव्हता व त्यामुळेच ब्रॅडलेने सत्य (truth) आणि सत्त (Existence) यात प्रकाराचा भेद न मानता प्रमाणाचा भेद मानला होता. या उलट प्रत्येक वाक्याचे सत्यत्व व प्रत्येक वस्तूचे अस्तित्व इतर वाक्यापेक्षा व वस्तूपेक्षा प्रमाणाने नव्हे तर प्रकाराने भिन्न आहे अशी रसेलची धारणा होती. Relation या प्रकाराला स्वतंत्र स्थान न देण्यात ब्रॅडले व लायब्नीज या दोघांची चूक होती असा रसेलचा दावा होता. वास्तविक लायब्नीज व ब्रॅडले यांची तात्विक बैठक विरोधी अशी होती. लायब्नीज हा अनेकत्ववादी तर ब्रॅडले हा एकत्ववादी. लायब्नीजच्या म्हणण्याप्रमाणे प्रत्येक वस्तू स्वतंत्र असल्यामुळे एका वस्तूचा दुसऱ्या वस्तूशी संबंध असणे मुळीच शक्य नाही. कारण असा संबंध असणे म्हणजे त्या वस्तूच्या स्वातंत्र्यावर घाला येण्यासारखे होते. याच्या उलट ब्रॅडलेच्या म्हणण्याप्रमाणे केवळ ब्रह्म तेवढे स्वतंत्र आहे व बाकीची प्रत्येक वस्तू ही त्या ब्रह्मावर अवलंबून असल्याकारणाने संबंध (relation) या तात्त्विक प्रकाराला काहीच स्वतंत्र स्थान नाही. परंतु रसेलला लायब्नीज किंवा ब्रॅडले या दोघांचेही म्हणणे पटत नव्हते. प्रत्येक वस्तू स्वतंत्र आहे खरी, तरी पण प्रत्येक वस्तूचा संबंध दुसऱ्या वस्तूशी येत असल्याकारणाने 'संबंध' या प्रकाराला स्वतंत्र स्थान आहे असा रसेलचा आग्रह होता. यालाच रसेलचा External Relations चा सिद्धांत म्हणतात. रसेलचे नंतरचे सर्व तत्त्वज्ञान 'संबंध' या तात्त्विक प्रकाराला स्वतंत्र स्थान देण्याच्या पायावर उभारलेले आहे. तर्कशास्त्रामध्ये रसेलने ॲरिस्टॉटलचे सार्वभौमत्व मान्य केले नाही याचे कारण हेच. ॲरिस्टॉटलच्या तर्कशास्त्रात 'गुण' या संज्ञेची व्याप्ती केवळ 'जाती' या संज्ञेपुरतीच मर्यादित होती. रसेलच्या म्हणण्याप्रमाणे गुण या संज्ञेत 'संबंध' या प्रकाराचा अंतर्भाव व्हायला हवा. रसेलचे गणितशास्त्राचे मूलभूत तत्त्वज्ञान 'संबंध' या तात्त्विक प्रकाराचे स्वतंत्र अस्तित्व मान्य करण्यावर अवलंबून आहे. प्रत्येक वस्तू ही इतर वस्तूंशी संबंधित आहे म्हणूनच प्रत्येक वस्तू ज्याप्रमाणे इतर वस्तूंपासून स्वतंत्र आहे त्याचप्रमाणे त्या वस्तूंमधला संबंधसुद्धा स्वतंत्र आहे हा रसेलचा आग्रह होता. व त्यात पुढे केव्हाही बदल झाला नाही.

### गणित व तर्कशास्त्र

आपली तत्वज्ञानाची बैठक अशा रीतीने पक्की केल्यावर रसेलने आपले जे मुख्य ध्येय म्हणजे गणित शास्त्राच्या मूलभूत तत्वांचा विचार करणे या गोष्टीकडे आपली दृष्टी वळविली. गणितशास्त्रातला मुख्य मुद्दा म्हणजे 'अंक' किंवा 'Number' या संज्ञेची तार्किक बैठक कोणती हा होय. कल्पना करा, माझ्यासमोर पाच लाल फुले आहेत प्रश्न असा आहे की ही पाच लाल फुले आहेत असे जेव्हा आपण म्हणतो त्यावेळी प्रत्येक फूल लाल आहे असे आम्ही अनुमान काढतो; पण प्रत्येक फूल जरी 'लाल' असले तरी प्रत्येक फूल काही 'पाच' असत नाही. याचा अर्थ असा की लाल या विशेषणाचा फूल या विशेष्याशी ज्या प्रकाराने संबंध येतो तशा प्रकारचा संबंध 'पाच' या विशेषणाने येत नाही. 'लाल' व 'पाच' ही फुलाची विशेषणे आहेत; परंतु या विशेषणात महदंतर आहे. ते अंतर केवळ प्रमाणाचे नसून प्रकाराचे (Categorial) आहे. ही गोष्ट प्लेटोने ओळखली होती व त्याने 'अंक' या प्रकाराला वस्तू (particular) व गुण (universal) या भेदांव्यतिरिक्त तिसरे विशिष्ट स्थान दिले होते. त्याला प्लेटोने Mathematical असे म्हटले आहे. प्लेटोनंतर बऱ्याच तत्वज्ञान्यांनी अंक किंवा number या प्रकाराबद्दल बरेच लिहिले आहे; परंतु रसेलवर या सर्व विवेचनाचा अनुकूल परिणाम होईना. प्रत्यकाचे काही तरी चुकते आहे अशी रसेलची खात्री झाली. त्याचे मन त्याला स्वस्थ बसू देईना. गणित शास्त्राचा पाया नीट बसवणे, तर्काधिष्ठित बसवणे, या गोष्टीचा रसेलने ध्यास घेतला व गणित शास्त्राची पुनर्रचना करणे हे आपल्या आयुष्याचे एकमेव ध्येय या जिद्दीने तो कामाला लागला. गणितशास्त्र हे भक्कम तर्कशास्त्राच्या पायावर उभारले गेल्याशिवाय गणितशास्त्राला शास्त्र म्हणून तरणोपाय नाही अशी रसेलची खात्री झाली. त्याची पुढल्या आयुष्याची दिशा निश्चित झाली, कार्यक्रम स्पष्ट झाला. गणित व तर्कशास्त्र याचा अन्योन्यसंबंध स्पष्ट केल्याशिवाय गणितशास्त्राच्या सिद्धांताची संगती लागणार नाही हे रसेलने ओळखले. त्याकरता त्याला तर्कशास्त्रात आमूलाग्र बदल घडवून आणणे जरूरीचे वाटले. ॲरिस्टॉटलचे तर्कशास्त्र त्याला अपुरे वाटले. गणितशास्त्राचा पाया जर भक्कम व्हायचा असेल तर तर्कशास्त्राचा पाया इतका भक्कम असायला हवा की त्याला गणित शास्त्राची इमारत सहज पेलता यावी. तर्कशास्त्राची सुधारणा घडवून आणल्याशिवाय गणितशास्त्राची बैठक भक्कम न होता डळमळीत राहील अशी रसेलची धारणा झाली व तर्कशास्त्राची पुनर्रचना करण्याकडे त्याने आपली दिशा वळवली.

### 'पियानो'च्या हातोटीचा पगडा

याच सुमारास म्हणजे सन १९०० साली पॅरीस येथे तत्वज्ञान्यांची जागतिक परिषद भरली होती. या परिषदेला जाण्याची रसेलला संधी प्राप्त झाली. त्या परिषदेत जगातील बडे बडे तत्वज्ञ जमले होते. परंतु त्या सर्व तत्वज्ञान्यांपैकी उठून दिसले व ज्यांनी रसेलवर आपला ठसा उमटवला ते म्हणजे इटलीचे Peano हे तत्वज्ञानी. पियानोची वाद-प्रतिवाद करण्याची हातोटी इतकी






आकर्षक व कौशल्यपूर्ण होती की रसेलला पियानोविषयी आकर्षण वाटायला लागले व त्याने पियानोची भेट घेतली. रसेलप्रमाणे पियानो हा सुद्धा गणितज्ञ होता व त्यालासुद्धा गणितशास्त्राच्या तत्वज्ञानाची ओढ होती व त्याचे संशोधन त्याच विषयावर होते. रसेलने पियानोकडून त्याने लिहिलेली सर्व पुस्तके घेतली व परत आल्यावर त्यांचा अभ्यास सुरू केला. पियानोच्या विचारप्रणालीचा रसेलवर इतका परिणाम झाला की त्याला आपण दररोज काही तरी नवीन शिकतो आहो असे वाटायला लागले. पियानोची व रसेलची भेट जुलै १९०० च्या अखेरीस झाली होती. त्याच वर्षाच्या ऑक्टोबर महिन्यात रसेलने Principles of Mathematics हा आपला ग्रंथ लिहावयाला घेतला व वर्षाच्या अखेरीस संपविला. ३१ डिसेंबर १९०० ला रसेलने या आपल्या ग्रंथाचे हस्तलिखित पुरे केले. म्हणजे केवळ चार महिन्यात मोठ्या आकाराच्या पाचशे पानांचा हा ग्रंथ रसेलने लिहून काढला. पियानो जर रसेलला भेटला नसता तर कदाचित् हा ग्रंथ लिहून झालाही नसता. वास्तविक पियानोचे सिद्धांत, ज्यांचा रसेलवर फार जबरदस्त परिणाम झाला, तसे काही पूर्णपणे नवीन नव्हते. पियानोच्या अगोदर जर्मन तत्वज्ञ Frege यांनी तेच विचार मांडले होते. कदाचित् पियानोपेक्षा फरेगेचे सिद्धांत अधिक सुसंगत व मूलगामी होते; परंतु फरेगेची कुणालाच ओळख नव्हती व त्याचे सिद्धांत गुलदस्तात पडून होते. इंग्लंडमध्ये तरी फरेगेची ओळख पहिल्यांदा रसेललाच झाली. पियानोलासुद्धा फरेगेच्या सिद्धांताची जाणीव नव्हती. पुढे पियानोऐवजी फरेगेच्याच तत्वज्ञानाचा रसेलवर व त्याचा विद्यार्थी आणि टीकाकार Wittgenstein याच्यावर फार फार पगडा बसला. इतका की रसेलचा Principia Mathematica आणि वित्गेंस्टाइनचा Practatus Logico-Philosophicus हे ग्रंथ फरेगेच्या तत्वज्ञानाशिवाय झालेच नसते. परंतु हा पुढचा भाग झाला. आपण प्रस्तुत पियानोचा विचार करीत आहोत.

पियानोच्या तत्त्वज्ञानाच्या ज्या दोन सिद्धांतांनी रसेलच्या विचारसरणीवर आपला पगडा बसवला ते हे. पहिला म्हणजे ज्या वाक्याचा कर्ता विशेषनाम आहे, उदाहरणार्थ, सॉक्रेटीस हा मर्त्य आहे, व ज्या वाक्याचा कर्ता विशेषनाम नसून उदाहरणार्थ 'सर्व माणसे, all men आहेत, ही दोन्ही वाक्ये एका प्रकारची नसून यांचे प्रकार भिन्न आहेत. 'सर्व' या शब्दाचा अर्थ मर्यादित नाही. अमर्यादित असा आहे. जर 'सर्व' या शब्दाचा अर्थ अमर्यादित असेल तर 'सर्व माणसे मर्त्य आहेत' हे वाक्य कसे काय जाणून घ्यायचे व त्याचे सत्यत्व कसे काय पारखायचे ? इथेच Propositional Function ची कल्पना उपयोगी पडली व याच कल्पनेचा पुढे रसेलला फार उपयोग झाला. आपण एखादे विशेषनाम घेतले तर ते नाव होते, Function होत नाही. Propositional Function चे विश्लेषण एका विशिष्ट प्रकारानेच करायला हवे. तिथे विशेषनामाप्रमाणे उपयोग करून भागायचे नाही. Naming निदर्शन निराळे व Describing वर्णन न करणे निराळे व या दोन प्रकारांची गल्लत होता कामा नये. सॉक्रेटीस मर्त्य आहे या वाक्यात कर्त्याचा उपयोग Naming करता, निदर्शनाकरता केला जातो. 'सर्व माणसे मर्त्य आहेत' इथे कर्त्याचा उपयोग निदर्शनाकरता केला जात नसून वर्णनाकरता केला जातो. एखाद्या व्यक्तीचे वा वस्तूचे निदर्शन करणे म्हणजे त्याचे वर्णन करणे नव्हे. त्याचप्रमाणे एखाद्याचे वर्णन करणे म्हणजे निदर्शन करणे नव्हे. निदर्शनाचा प्रकार हा वर्णनाच्या प्रकाराहून भिन्न आहे.

**गटांचा गट म्हणजे काय !**

पियानोचा जो दुसरा सिद्धांत रसेलने उचलला तो class 'वर्ग' किंवा गट या कल्पनेसंबंधी. अंक किंवा Number या कल्पनेचे विश्लेषण करताना Class किंवा वर्ग ही कल्पना रसेलला उपयोगी पडली. Principles of Mathematics या ग्रंथात रसेलने या कल्पनेचा बराच उपयोग केला आहे. समजा आपल्याला 'पाच' या अंकाचा अर्थ समजून घ्यावयाचा आहे. वर सांगितलेले आहे की 'पाच लाल फुले' या शब्दप्रयोगात 'पाच' हे विशेषण व 'लाल' हे विशेषणे एका प्रकारची नसून ती भिन्न आहेत. हे भिन्नत्व आले कुठून ? रसेलचे त्याला उत्तर असे : समजा आपण पाच आंबे, पाच फणस व पाच केळी असे तीन गट किंवा वर्ग किंवा Class केले आहेत. या तीन वर्गांना आपण अ, ब, क, अशी नावे देऊ या. या तीन गटांमध्ये साम्य आहे ते असे की या गटातील वस्तूंची संख्या समान आहे. व ही संख्या समान आहे म्हणून अ, ब, क या तीन गटात साम्य आहे. याच्या पुढची पायरी म्हणजे या तीन गटात जे साम्य आहे त्या साम्याच्या आधारावर आपण त्यांचा व जगातील ज्या इतर गटांचा या तीन गटांशी साम्य आहे असा वर्ग तयार करूया. त्या वर्गाला आपण क्ष असे नाव देऊ. हा क्ष गट




ऐसी ना मारो पिचकारी हम सब हो गये घायल भ.ति


अनुक्रमणिका

किंवा वर्ग, किंवा class हा जगातील सर्व गटांचा परंतु अ, ब, क या गटांशी साम्य असणाऱ्या गटांचा वर्ग होईल. याला रसेल class of all classes असे म्हणतो. पाच ही संख्या जगातल्या ज्या पाच वस्तूंच्या गटांमध्ये साम्य आहे त्या गटांचा गट होईल. प्रत्येक संख्या ही अशा तऱ्हेने गटांचा गट किंवा class of all classes आहे. गणितशास्त्र व इतर शास्त्रे यामधला भेद असा की इतर शास्त्रे जगात असलेल्या गटांचा विचार करतात तर गणित शास्त्र त्या गटात असलेल्या साम्याचा विचार करते. लाल हे विशेषण केवळ जगातल्या काही विशिष्ट वस्तूंशी संलग्न आहे तर पाच ही संख्या विशिष्ट वस्तूंच्या गटाशी संलग्न नसून त्या सर्व गटातल्या साम्याशी संलग्न आहे. 'जाती' हा प्रकार प्रत्यक्ष वस्तूंच्या गटाशी निगडीत असतो तर 'संख्या' हा प्रकार प्रत्यक्ष जातीत जी विशिष्ट संख्या असते त्या सर्व जातीतल्या साम्यावर निगडीत असते. गणितशास्त्राचा पाया हा जातीवर आधारलेला नसून या जातीतल्या साम्यावर आधारलेला आहे असा रसेलचा सिद्धांत आहे.

**क्षणभंगूर 'बौद्धीक मधुचंद्र'**

पियानोपासून घेतलेल्या या सिद्धांतांचा रसेलवर इतका परिणाम झाला की आपण जगातल्या तत्वज्ञांना भेडसावणाऱ्या एका कूट प्रश्नाचा उलगडा केला असे रसेलला वाटले. प्रत्येक संख्याचे गटांचा गट किंवा class of all classes, ही कल्पना इतकी आकर्षक होती की रसेलचा आनंद गगनात मावेना. त्याच्या आयुष्यातला हा कालखंड त्याला फार उत्तेजक वाटला. त्याचे वर्णन रसेलने intellectual honeymoon 'बौद्धिक मधुचंद्र' असे केले आहे. दुर्दैवाने हा मधुचंद्र क्षणिकच ठरला. कारण गटांचा गट, class of all classes, ही कल्पनाच मुळीच वदतोव्याघाताचे एक उदाहरण ठरली. Class of all classes यामधल्या पहिल्या class या शब्दाचा अर्थ व दुसऱ्या classes या शब्दाचा अर्थ या दोन्ही अर्थात विरोध आढळतो. तो विरोध येणेप्रमाणे समजा एका गटात पाच आंबे आहेत. तर तो गट म्हणजे सहावा आंबा नव्हे. याचा अर्थ असा की कोणताही गट त्या गटाचा घटक नसतो. परंतु जेव्हा आपण गटांचा गट किंवा class of all classes याचा विचार करतो तेव्हा नेमकी ही अडचण आपणास आढळते. जर गट किंवा class हा त्या गटाचा घटक नसेल तर वरील वर्णनात पहिला class हा classes याचा घटक असता कामा नये. जर असे असेल तर all classes मधल्या all या शब्दाला अर्थ राहाणार नाही. याचे कारण असे की एक class त्या classes चा घटक राहाणार नाही व त्यामुळे all या शब्दाला अर्थ राहाणार नाही. All या शब्दाला जर काही अर्थ असेल तर class of all classes-मधला पहिला class दुसऱ्या all classes चा घटक असला पाहिजे. परंतु आपण वर पाहिलेच आहे की व्यवहारात कोणताही गट आपल्या गटाचा घटक होत नाही. कारण जर एखादा गट आपल्याच गटाचा घटक बनला तर तो गट किंवा class होत नाही. तेव्हा class of all classes मध्ये पहिला class जर all classes चा घटक बनला तर पहिला class हा class होऊ शकणार नाही. व जर घटक बनणार नसेल तर classes मधल्या all या शब्दाला अर्थ राहाणार नाही. याचा सरळ अर्थ असा की class of all classes मधला पहिला class, all classes ला छेद देतो व class of all classes या विधानाला काहीच अर्थ राहात नाही. यालाच Paradox of classes असे म्हणतात.

जेव्हा रसेलच्या लक्षात ही गोष्ट आली तेव्हा पुढे काय करावे ते त्याला सुचेना. आपण एवढ्या परिश्रमाने उभारलेली इमारत देखताडोळ्या जमीनदोस्त होण्याचा हा प्रसंग होता. गणितशास्त्राला आता काहीच आधार उरला नव्हता. गणितशास्त्राला तर्कशास्त्राचा आधार देण्याच्या प्रयत्नात तर्कशास्त्रानेच गणितशास्त्राला लत्ताप्रहार करण्यासारखाच हा प्रसंग होता. आता गणितशास्त्राची वाट काय हा प्रश्न रसेलला भेडसावयाला लागला. अशा स्थितीत रसेलने इतर तत्त्वज्ञान्यांच्या नजरेला हा प्रसंग आणला. फरेगेने तर कपाळालाच हात लावला व इतःपर गणितशास्त्रावर काहीही विचार न करण्याचा निश्चय केला. फ्रेंच तत्वज्ञ पॉइंकारे (Poincare) याने तर नाक उडवले. गणितशास्त्राला तार्किक आधार देण्याचा रसेल किंवा फरेगे यांचा प्रयत्न पोइंकारेला मुळीच मान्य नव्हता. बाकीचे इतर तत्वज्ञ म्हणाले "फार झालं आता. आम्ही या प्रयत्नात दमून गेलो आहोत. आता विषय बदलूया. गणितशास्त्राच्या वाटेला न जाता आपण इतर गोष्टीत लक्ष घालूया." परिस्थिती फार गंभीर होती; परंतु कुणालाच काही सुचत नव्हते.

(पष्ठ ५५ वर)

**राजकीय आघाडीवरील बोंबाबोंब (शिमगा)**



६

## क्लृप्तीने मिळती कामे--

जिमी कॅग्ने याच्या चित्रपटासाठी माझा जो करार झाल त्याबद्दल आवतीभोवती बऱ्याच भूमिका उठल्या. परंतु त्याबाबत सर्वात जास्त माहिती मला वाटतं मलाच असण्याची शक्यता आहे. मी थापा मारण्याची शक्यता आहे; पण थापा मारून तरी मला नेमकं काय लाभणार आहे ?

तेव्हा मी खरीच माहिती सांगते हं. मी विविध चित्रपटातून भूमिका करीत होते. तेवढ्यात मला बातमी लागली की कॅग्ने प्राडक्शन्सला एका तरुण, रूपवती आणि आकर्षक व्यक्तित्वाच्या मुलीची गरज आहे. ह्या बातम्या कशा पसरतात सांगणे कठीण, पण पसरतात. ह्यावेळी मी प्रयत्न करण्याचा विचार केला. पण तो करताना आणखीही एक निश्चय केला–दलाल वा अडत्याच्या मध्यस्थीने हे काम मिळवायचे नाही. माझं आपलं एक मत आहे की, दलाल वा अडत्यांशिवाय ज्या नटीला परस्पर कामे मिळविता येतात तिला अधिक मोठ्या रकमेचे करार करण्याचे भाग्य लाभते.

निर्माता वा नटनटींची निवड करणाऱ्या माणसातली फारच थोडी माणसं अशी दिसतील की जी स्तुती आणि प्रणयाराधन वा प्रणय क्रीडांना बळी पडत नाहीत. ती जणू त्यांची हक्काची कमाई वा दलाली असते. ती मोजल्याशिवाय जणू रुपेरी दुनियेत प्रवेश मिळणार नसतो. मिळत नाही.

काम–कसलेही काम मिळावे म्हणून प्रारंभी साऱ्याच माणसांना हे मोल द्यावे लागते.

परंतु मुख्यतः ह्या साऱ्या कसोटचांपेक्षा आणखीही एका गोष्टीचा ह्या व्यवसायात भूमिका मिळविण्याच्या दृष्टीने फार उपयोग होतो. ती गोष्ट म्हणजे थोडासा मिश्किलपणा, वात्रटपणा ! कलेपेक्षा क्लृप्तीने पुष्कळदा कामे होतात. तुमची हुशारी, तुमचे वशिष्टय त्यात व्यक्त करता येते. तुमच्याकडे लक्ष वेधून घेता येते. अन्यथा माणसांच्या घोळक्यात तुमचे वैशिष्टय चटकन कसे ध्यानी येणार ?

गंमत सांगते. एका चित्रपटात हवाई सुंदरीच्या भूमिकेसाठी नटी हवी होती. त्यासाठी कोलंबिया स्टुडियोच्या पटांगणात मुलाखती घेतल्या जात होत्या. मी गंमत केली. माझ्या मित्राच्या हेलिकॉप्टरमधून मी थेट त्या पटांगणातच उतरले. त्या माझ्या क्लृप्तीचा उपयोग झाला. मला भूमिका मिळाली व भरपूर प्रसिद्धीही ! ट्वेंटिएथ सेंचरी फॉक्सला ॲलिस फायेच्या बहिणीची भूमिका करण्यासाठी नटी हवी होती. त्या आठवड्यात मी तिचे सर्व चित्रपट पाहिले. तिचे चालणे, बोलणे, वागणे पाहून घेतले. त्याची हुबेहूब नक्कल करायची खूप तयारी केली. त्या काळात मी स्वतःला बार्बारा फायेच म्हणवून घेत होते.

तात्पर्य ?

नेहमी रूप, गुणांचाच उपयोग होतो असं नाही ! वात्रटपणा हवा. क्लृप्ती हवीच !

जेम्स कॅग्नेच्या स्टुडियोत गेले. निवड समितीच्या ऑफिसाच्या बाहेर अनेक तरुण, सुंदर मुली बसल्या होत्या. त्यांचे चेहरे



— प्रभाकर अत्रे





अनुक्रमणिका

पाहिले आणि माझी मनोमन खात्री पटली की, आपल्याला संधी मिळणे अशक्य ! उकाड्याचे दिवस होते. ऊष्मा फारच जाणवत होता आणि मनात मी अस्वस्थ झाले होते.

युक्तीची गरज होती ! तरच लक्ष वेधले जाण्याची व काम मिळण्याची शक्यता होती.

मी तडक कास्टिंग डायरेक्टरच्या खोलीत गेले. कोचात स्थिरावले. बूट मोजे काढून फेकीत व माझे पाय नाचवीत म्हणाले, "काय उकाडा होतोय्, नाही ?"

त्याच्या समोर एक उमेदवार मुलगी बसली होती. ती गेल्यावर तो माझ्याकडे पहात राहिला—ही मुलगी पागल तर नाही ना !" त्याची दृष्टी सुचवीत होती.

मी मनमोकळेपणानं त्याला सांगून टाकलं—"असलं काही जगावेगळं मी केलं नसतं तर तुमचं लक्ष मला कसं वेधून घेता आलं असतं ?"

माझ्या धाडसीपणाबद्दल स्टुडियोच्या परिसरात खूप चर्चा झाली. पण माझी कसोटी घेण्यात आली व माझा करारही झाला.

अशा खूप गमती जमती मला ठाऊक आहेत. नावं सांगायची बंदी आहे; पण तुम्ही सहज ओळखाल.—मला खात्री आहे.

एका उदयोन्मुख गायिकेने आपल्या कॉलेजमध्ये जाणाऱ्या बहिणीकडे एका स्टुडियो प्रमुखाला पाठवले. त्याला मुक्त परवाना दिला.

परिणाम—ती गर्भवती झाली.

मग त्याच प्रमुखाने एका उदयोन्मुख तरुण नटाला तिच्याशी लग्न करायला सांगितले. सुदैवाने ते लग्न झाले. मोडले नाही. त्यांना तीन मुले आहेत.

'फे स्पेन' हिने "गॉडस् लिटल एकर"मधील भूमिकेसाठी टेस्ट दिली. ती वाद झाली. मग तिने आपली काही 'नग्न' छायाचित्रे काढवून घेतली व ती दिग्दर्शकाकडे पाठवून दिली. तिला भूमिका मिळाली. एकाने तर चक्क वेश्यागारातून काही मुली 'बुक' केल्या आणि त्या निरनिराळ्या निर्माते दिग्दर्शकांकडे जणू गरती वाया आशा थाटात पाठवून दिल्या. त्या स्त्रियांनी त्या दिग्दर्शक निर्मात्यांची निवासस्थाने व्यापली. आणि मग त्या माणसाने त्यांची भेट घेतली. सत्य सांगितले. सारे विवाहित होते. ह्या 'सत्या'च्या प्रयोगाच्या बदल्यात त्याला भूमिका मिळाल्या हे वेगळे सांगणे नलगे. ते निर्माते त्याचा अजून तिरस्कार करतात; परंतु त्याला चित्रपटात भूमिका हवी तेव्हा व हवी तशी मिळते. त्यांना तो नको असला तरीही मिळते. टेलिव्हिजनवरही त्याला कामे मिळतात. एका चित्रपटात मला 'नन्'ची भूमिका हवी होती. मिळणे कठीण होते. मग मी युक्ती केली. त्या चित्रपटाचा निर्माता धार्मिक वृत्तीचा होता व तो दर शनिवार-रविवारी चर्चमध्ये जातो हे मला ठाऊक होते. मी चर्चमध्ये गेले. फादरला भेटले. चर्चला एक मोठी देणगी जाहीर केली. निर्माते त्या चर्चचे एक विश्वस्त होते—त्यांची माझी ओळख करून देण्यात आली. धर्म 'अर्थ'-कारणी लागला. मला हवी ती भूमिका मिळाली.

## आवतसे लाचार

सवय कसली, व्यसन कसले ह्याला महत्त्व नाही. माणसे त्यापायी लाचार होताना आपण पाहतो. ती अगतिक होताना दिसतात. काही वेळा शीण घालविण्यासाठी आपण व्यसनाच्या पहिल्या पेल्याला स्पर्श करतो. मग आपणच त्या पेल्यात बुडून जातो.

अशाच एका संध्याकाळी मी मद्यालयात भरपूर मद्य झोकले. माझ्याबरोबर एक तरुण अभिनेता होता. मद्य त्याच्या डोक्यात चटकन चढत असे. त्या दिवशी तसेच चढले. आणि त्याने तुफानी लाथा झाडल्या. माझ्या नाकातोंडातून रक्त येऊ लागले. मी स्त्रियांच्या रंगपटाकडे गेले. माझी ती अवस्था पाहून एक सुंदर, तरुण अशी चित्रकारका पुढे आली अन् मला म्हणाली 'मी तुम्हाला मदत करू का?' तिला उत्तर देण्यासाठी आसू पुसण्याचा प्रयत्न मी केला; पण मला त्यात यश आले नाही.

तिच्या चेहऱ्यावर सहानुभूती दिसू लागली. माया दाटून आली; पण त्या मायेचे रूप काही तरी आगळे वेगळे आहे असे माझे मलाच जाणवत गेले. समलिंगी संबंधाचा तिला अनुभव होता—मला ते सारे जगच मुळी नवे होते.

नंतर तिने अपार सहानुभूतीने माझ्या खांद्यावर दोन्ही हातांनी थोपटल्यासारखे केले. मग मला मिठीत घेत ती म्हणाली "माझाही आत्ताच माझ्या मित्राशी असाच झगडा झाला. पुरुषांचं मन मोठं विपारी असतं बघ. वृत्ती क्रूर असते. त्यांना स्वामित्व हवं असतं. हवा असतो सर्वाधिकार ! पुरुषांशिवाय जर आपल्याला जगता आलं असतं तर—"आणि मग अचानकपणे एखादा विचार सुचावा तसं ती म्हणाली—"मला त्यांच्याकडून हवे असतात काही मजेचे—सुखाचे क्षण ! मला प्रीती नको असते. हव्या असतात नोकऱ्या, हवी असते प्रसिद्धी आणि मदतही."

"मला प्रेम नको" ती म्हणत होती. त्या वाक्याने माझे लक्ष वेधून घेतले—मी मात्र तिला म्हणाले. "पण मला प्रेम हवं असतं. हवंय्."

"आपणा साऱ्यांनाच ते हवं असतं; पण प्रेमाच्या परी वेगळ्या असतात" असं म्हणत तिने मला मिठी मारली आणि माझे चुंबन घेतले—ओष्ट चुंबन ! ती मिठी आणि ते चुंबन वेगळे होते. तो सारा अनुभव मला सर्वस्वी नवीन होता.

एक दिवस जीनच्या विनंतीवरून मी तिच्या घरी गेले. मला नकार द्यावासा वाटत होता. पण का कुणास ठाऊक, मी नकार देऊ शकले नाही. कुठले तरी नवे जग मला दिसणार होते ते पाहण्याची उत्कट इच्छा जणू मला भारून टाकीत होती. त्या रात्रीचे तिचे सारे वागणे —

माझ्या आयुष्यातले एक नवे प्रकरण त्या दिवशी सुरू झाले. पुढे तसली अनेक झाली. पुरुषांनी माझा मनोभंग—स्वप्नभंग केला की






असली प्रकरणे माझ्या आसवांवर फुंकर घालण्याचे व मला धी देण्याचे काम करीत असत.

जीनमुळेच मिस सिमन्स नावाच्या असल्याच प्रकरणांवावत प्रसिद्ध असलेल्या स्त्रीची आणि माझी ओळख झाली. तिच्याबद्दल बऱ्याच गोष्टी मी तोवर ऐकल्या होत्या. असल्या प्रकरणांची झिंगही मी अनुभवली होती. व्यसनी माणसे नेहमीच 'आदतसे लाचार' असतात. ह्या सिमन्सबद्दल असेच कुतुहल होते.

एके रात्री मी तिच्या घरी गेले. तिचे सारे वागणे पुरुषी होते. लांडग्या वृत्तीच्या पुरुषी पद्धतीचे ते वागणे होते. सिमन्सचे सारेच वागणे अत्यंत अस्वाभाविक, अनैसर्गिक होते. अकल्पनीय होते. शब्दांनी नाही वर्णन करता येणार.

नंतर तिने मला वेदम मारले व अंगभर ओरबाडले. आणि एका खोलीत ढकलून देऊन तिने कुलूप लावून घेतले. मी फोन करण्याचा प्रयत्न करू लागताच तिने माझ्या थोबाडीत मारली. सारा रविवार मला तिच्या घरात बंदी म्हणून घालवावा लागला. सोमवारी तिलाही कामावर जायला हवे होते. मलाही स्टुडियोत जाणे भाग होते. ती गेली. जाताना मला म्हणाली "खबरदार गेलीस तर!"

पण मी पळून आले. त्यानंतर मिस सिमन्सचे मी पुन्हा तोंडही पाहिले नाही. प्रकरण संपले. नंतर मला कळले की, तिला अशा नित्य नूतन मुलीच लागत असत.

हा रोग आहे किंवा ह्याचे रोगात रूपांतर होण्याची शक्यता आहे हे मला ठाऊक आहे. परंतु ह्याला मानसोपचारांची गरज आहे. मी मात्र असला एखादा रोगी मानसोपचाराने बरा झाल्याचे ऐकले नाही. ह्या जगात ह्या विशिष्ट शस्त्राचा आणि तंत्राचा विविध कारणांसाठी मग उपयोग करता येतो. माझं द्रव्य आणि माझं तारुण्य यांचा उपभोग घेऊन मग क्रूरपणाने वागून पळून गेलेल्या माझ्या एका मित्राच्या प्रेयसीला मी ह्याच अस्त्राचा उपयोग करून फोडले. आणि एका विचित्र पद्धतीने मी सूडाचे समाधान मिळविले. एका सुविख्यात नटीबरोबर एका चित्रात मला काम हवे होते; पण मी त्या भूमिकेला योग्य नाही असे कास्ट डायरेक्टरचे मत होते. त्या नटीच्या शब्दाला भलताच भाव होता. मी तिच्यासमोर जाऊन उभी राह्यले. ती भूमिकेसाठी वेषभूषा करीत होती. 'सुंदर' मी म्हणाले, आणि अशा काही लोभसवाण्या दृष्टीने तिच्याकडे पाहिले की ती खूप झाली. तिच्या दृष्टीत मला 'तसल्या' सोबतीची भूक वा निदान आवाहन तरी दिसले– आमची मैत्री जमली. मला हवी ती भूमिका मिळाली.

## प्रीत में रीत कहाँ?

आजपर्यंत मी जे काही सांगितलं त्यात शारीरिक वासना व उपभोग यांच्यासंबंधी बरचसं काही होतं हे खरं असलं तरीही आयुष्य असं कधी एकांगी व एकारलेलं असत नाही. त्या वासना-विकारांना माझ्या जीवनात महत्त्व होतं पण तेच काही माझं सर्वस्व नव्हतं. ह्या वासना–विकारांवर मात करू शकणाऱ्या काही स्त्री-पुरुषांशी माझी दीर्घकालीन मैत्री होती.

एकायला जरा चमत्कारिक वाटेल, पण खरंच सांगतो की एका अतिशय देखण्या, सुदृढ पण दैवाने शिकार केल्यामुळे नपुसक बनलेल्या एका तरुण माणसावर मी खूप खूप प्रेम केलं. त्याच्याशी इमान राखून मी खूप काळ जगू शकले. एका चमत्कारिक प्रसंगामुळे 'आपण हिच्यावर अन्याय करतो आहोत' अशी त्याची भावना झाली व तो मला सोडून न सांगता सवरता निघून गेला नाहीतर मी कदाचित माझं उर्वरित आयुष्य त्याच्या सहवासात काढलं असतं.

लॉस एंजेलीसला एका पावसाळी दिवशी त्याची माझी भेट झाली. पाऊस अचानक सुरू झाला. जॉनीजवळ छत्री नव्हती. मी आसऱ्याला उभी होते तिथे तो आला. 'भलताच पाऊस बुवा' तो म्हणाला. थांबला. मी त्याला लिफ्ट दिली. मग कळले की तो चित्रकार आहे. त्याने माझ्या चित्रपटातील भूमिका पाहिल्या होत्या. तो म्हणाला "मला तुमचा एखादा झकास फोटो द्याल? मी त्यावरून एखादे पोर्ट्रेट करीन."

"फोटो कशाला? मीच स्वतः तुझ्यासमोर बसेन. तू चित्र तयार कर" मी त्याला म्हणाले.

त्याने माझे चित्र 'पेस्टल'मध्ये केले. मला दिले. तो तरुण मला खूप खूप आवडला होता. सुंदर रूप, सुदृढ शरीर, सुरेख कांती–पण–

पण माझ्याशी आजवर वागत आलेल्या पुरुषांपेक्षा तो वेगळा वागत आला होता. त्याने मला स्पर्श केला नव्हता. माझे चुंबनही घेतले नव्हते.

म्हणून एके रात्री चित्रणाच्या निमित्ताने मी त्याच्यापुढे 'न्यूड' म्हणून उभी राह्यले. तो गोरामोरा झाला. "नको वारंवार, हे असं नको" असं म्हणत तो पडेल चेहऱ्याने माझ्याकडे पाहायला लागला. मी त्याच्याजवळ गेले–त्याचे चुंबन घेतले. परंतु प्रतिसाद नव्हता. मी हे प्रथमच अनुभवीत होते. मग तो म्हणाला "मी आठ वर्षांचा होतो ना, तेव्हा एक मोटार अपघातात सापडलो. सारा खेळ खलास झाला. काही विकार-भावना उरल्याच नाहीत" त्याचा कंठ दाटून आला होता.

"वाईट वाटून घेऊ नकोस. मी तुला अंतर देणार नाही. पण कलावंताला भावना-विकार हवेतच नाही का? अडत नाही तुझं?"

"नाही! हा भाग सोडला तर सारं काही झकास चाललंय! आयुष्य सुंदर आहे. आनंदमय आहे."

मी त्याचं चुंबन घेतलं.

दया, सहानुभूती, स्त्रीसुलभ मातृत्व भावना, वात्सल्य आणि एका सुंदर माणसाबद्दल वाटणारी अपार प्रीती—वेगळेच प्रेम मी अनुभवीत होते. ह्या माणसाचे माझ्यावर प्रेम होते. केवळ शरीर लाभलेली एक भोगदासी म्हणून तो माझ्याकडे पहात नव्हता.

त्याला स्वतःलाच एकदा असं वाटलं की आपण हिच्यावर अन्याय करीत आहोत. तेव्हा तो मला म्हणाला. 'पटेल त्या पुरुषाकडे तू जाऊ शकतेस. फक्त ते माझ्यासमोर घडू नये वा माझ्या कानी येऊ नये येवढीच इच्छा!"

मी सुखी होते. मी नकार दिला.







अनुक्रमणिका

आणि अचानक—

त्याच्याच आग्रहावरून आम्ही दोघे त्याच्या घरी गेलो. जॉनीच्या भावाला—रिचर्डला पाहताच कां कुणास ठाऊक मी हादरले. जॉनीच्या आणि त्याच्या चेहऱ्यात विलक्षण साम्य होते. फक्त क्रूरता—शिकारी वृत्ती त्याच्या चेहऱ्यावर नाचत होती.

जेवणावरोवर मद्यपान झाले. जॉनीच्या वडिलांच्या आग्रहावरून मी बाग पहायला बाहेर पडले. तेवढ्यात त्यांना कुणीतरी हाक मारली. ते परतले. तेवढ्यात रिचर्ड माझ्याकडे आला. त्याने धसमुसळेपणाने येऊन माझे चुंबन घेतले. मी त्याच्या थोबाडीत मारली. त्यानेही मला एक ठेवून दिली. नंतर त्याने मला ओढून जवळच्या ग्रीन हाऊसमध्ये नेले. आणि पुरुषी इच्छा तृप्त करून घेतली. त्यानंतर मी पुन्हा त्याच्या श्रीमुखात भडकावली. तो फक्त हसला.

मी परतले. जॉनी शांत बसला होता. द्राक्षे खात होता. हे प्रकरण उघडकीस येऊ नये म्हणून मी लवकर निरोप घेऊ चाहत होते. परंतु रिचर्डने मद्याचा अंमल असल्यामुळे त्याचा उल्लेख केला. तेव्हां जॉनी जागेवरून उठला. त्याने रिचर्डला तुफानी चोप दिला. जॉनीचे वडील मध्ये पडले नसते तर कदाचित —

आम्हीं बाहेर पडलो. मला शरमल्यासारखे झाले होते. जॉनीला सारं काही खरंखुरं सांगून टाकावं असं मला वाटत होतं. पण जॉनी गप्प होता. त्याच्या घरी त्याला मी सोडून दिले. मी क्षमा मागितली—तेव्हाही तो काही बोलला नाही.

दुसऱ्या दिवशी सकाळी मी त्याच्या घरी गेले.

तो घर सोडून निघून गेला होता. त्याचा पत्ताही कुणाला ठाऊक नव्हता.

मला तो पुन्हा कधी दिसलाच नाही!!

## चंचल कीर्ती (आणि लक्ष्मीही)

कीर्तीशिखराची स्वप्ने प्रत्येकच कलावंताला पडत असतात, त्यात चूक काय? गुन्हा कसला? पण शिखर कधी गवसतच नाही. असतं की नाही कुणास ठाऊक? वर वर जात असतो ना आपण, तेव्हा भ्रम सरत जातात. स्वप्ने ओसरत जातात. मला भूमिका मिळत होत्या. मला त्याहून मोठ्या भूमिका हव्या होत्या; पण माझ्या लफडयांनी माझं आयुष्य खाऊन टाकलं होतं. टॉम नील आणि फ्रँकॉट टोन या दोघांच्या सहवासात माझ्या दृष्टीने इष्ट काय आणि मला नेमके हवे काय याचा निर्णय होत नव्हता. कीर्तीवंत नटींची एकाच वेळी दोन-तीन पुरुषांशी लफडी असल्याचे मी ऐकत-पहात होते. पण मला मात्र ते जमत नव्हते. टॉमचे आणि माझे चांगले जमत होते. तो सुदृढ होता. टणक होता. कमावलेल्या शरीराचा त्याला अभिमान होता. माझे शरीर मी चांगले जपले होते. फ्रॅकॉट टोन हा प्रामाणिक प्रेमळ माणूस होता. मी फ्रॅकॉटशी लग्न केले तेव्हा हे कायमचे टिकेल अशी माझी भावना होती. ते टिकले नाही. टॉमबरोबरचे वास्तव्यही तसेच अल्पकालीन ठरले.

यश, कीर्ती, सुख यांच्या शिखरावर मी होते तेव्हा सारं काही कायम टिकणार आहे अशी माझी भाबडी श्रद्धा होती. त्या काळात माझ्या आयुष्यात येऊन गेलेल्या बड्या बड्यांची नावे सांगत बसत नाही, नाहीतर त्यांच्या बायका माझ्यावर फिर्यादी करायला धावतील.

माझं असणं, फिरणं, माझी गाडी, माझी स्वाक्षरी, माझी चित्रे—सारंच काही लोकप्रिय होतं—चर्चेचा विषय झालं होतं.

चित्र व्यवसायातल्या एका सर्वश्रेष्ट नटाने एक दिवस मला चित्रपटाच्या उद्घाटनाला नेले. वाटेत त्याच्या नोकराणीने मला 'जेड नेकलेस' दिला. नंतर उत्तम कपडे भेट म्हणून दिले गेले. जेवणाच्या वेळी त्याने मला लग्नाची मागणी घातली. मी नकार दिला. 'टॉम नील'कडे मी रहात होते व त्याला सोडून देण्याची कल्पना मला मान्य नव्हती.

नंतर आम्ही लागूना, तिजुआना, हवाईला गेलो—पुन्हा त्याने मागणी घातली. मी नकार दिला. रोमला चलण्याची त्याने विनंती केली (त्याचा जन्म रोमचा)—मी नकार दिला. परतले. विमानतळावर त्याने 'जेड ब्रेसलेट' भेट म्हणून दिला.—

कीर्तीच्या मार्गावर माणूस असला की असंच घडत असतं. असंच घडत राहील असं वाटतं, घडत मात्र नाही.

एका वेळी चार स्टुडियोंची मागणी यायची. मी व टॉम चिठ्ठया टाकायचो. चिठ्ठीत ज्या स्टुडियोचे नाव येईल त्यात मी काम करायची.

पैसा मिळत होता. पण माज आला नव्हता. माणुसकी विसरले नव्हते. भुकेल्यांना मी अन्नाची पाकिटे द्यायची आणि रजेत दवाखान्यांना भेटी देऊन रुग्णांची सेवा—चौकशी करायची. कुणाला कपडे, वस्तु भेटी द्यायची. चित्र व्यवसायात भेटीसाठी खूप पैसा जातो. माझाच नाही—साऱ्यांचाच! पैसा मिळतच असतो. मिळत राहणारच असतो अशी तेव्हा भावना असते. म्हणून मग चित्रपटाच्या निर्मितीला हातभार लावणाऱ्या अनेक साहाय्यक कलावंतांना मी घड्याळे, प्रवासी पिशव्या, सूट, कॅमेरे आदि वस्तू भेट म्हणून देत असे. एका छायाचित्रकाराने माझा संपूर्ण चित्रपट फार छान घेतला म्हणून त्याला मी सुरेख घरही घेऊन दिले.

पैसा मिळत होता—कसा मिळवावा वा मिळतो तेही मला ठाऊक होते. भेटी मिळवणं हाही एक खेळ आहे. निदान मला तरी तसा वाटला अन् जमला. नजरेने मला सावजं टिपता येत होतो. नजरेनेच सहवासाचं मोलही ठरता येत होतं. ठरवताही येत होतं.

आज भेटींची आणि पैशांचीही समस्या उरली नाही.

किंवा —

खरं तर तेवढीच समस्या बाकी उरली आहे.

[क्रमशः]









| परिसंवाद |

**आजचा तरुण हा नोकरशाहीच्या सावटाखाली वाढत असल्याने त्याच्यावर एक प्रकारच्या लाचार जीवनाची पुटे चढलेली असतात; ही पुटे धाडसाने समूळ काढून टाकणारा तरुणच खराखुरा बंडखोर ठरेल...**

# बंडखोरीचे स्वागतच व्हावे

**—रमेश शंकरराव समर्थ**

राजकारणाप्रमाणेच साहित्य, समाजजीवन, शिक्षण इत्यादि सर्वच क्षेत्रात आज प्रस्थापितांविरुद्ध बंडाच्या आरोळ्या उठत आहेत त्या माझ्या अल्पबुद्धीप्रमाणे आणि मताप्रमाणे अत्यंत योग्य आहेत. परंतु त्या कितपत योग्य आहेत या आपल्या प्रश्नामध्ये 'कितपत' असा जो शब्दप्रयोग करण्यात आला आहे त्या शब्दाला अनुसरून या प्रश्नाचा विचार माझ्या अल्पमतीनुसार करण्याचा मी प्रयत्न करणार आहे. प्रस्थापितांविरुद्ध बंडाच्या आरोळ्या ही आपल्या प्रश्नातील शब्दरचना म्हणजे 'तर मग बोंबाबोंब' अशा थाटाची किंवा तशा तऱ्हेच्या घाटाची आणि जरा नवतेकडे झुकणारी आहे. जीवनातील राजकारण, साहित्य, समाजजीवन, शिक्षण या चार क्षेत्रांचा उल्लेख आणि अखेरीस इत्यादि असा शब्दप्रयोग केल्यामुळे झाडून सर्वच क्षेत्रांना आपल्या या प्रश्नाने व्यापून टाकले आहे.

कोणत्याही युगात, कोणत्याही काळात जेव्हां जेव्हां अन्याय, अत्याचार यांना ऊत येतो, तेव्हां तेव्हां पददलित समाज क्रांतीचा उठाव करतो आणि दुष्कृत्यांची, निंद्य कर्मांनी व सत्तेने धुंद-अंध झालेल्या आसुरी सत्ताधाऱ्यांचा समूळ नायनाट करतो ह्या सुवर्णतत्वाचे प्रतिपादन पुराणात ऋषिमुनींनी, महाभारतीय प्रचंड महायुद्धकालात

> "यदा यदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत
> धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे"

या श्लोकात भगवान श्रीकृष्णांनी आणि अर्वाचीन कालखंडात "भांडवलशाहीच्या जन्माबरोबरच तिच्या नाशाची बीजे त्या त्या समाजात रोवली गेलेली असतात" या विरोध-विकासवादी तत्त्वाचे प्रतिपादन करून सिद्ध केले आहे.

आजच्या युगात राजकारण या क्षेत्राला अतिशय महत्त्वाचे आणि व्यापक स्वरूप प्राप्त झाले आहे आणि 'जिसके हाथ राजसत्ता उसकी मुठीमें प्रजाकी मालमत्ता' ह्या तत्त्वानुसार प्रत्येक राष्ट्र, प्रत्येक देश आणि प्रत्येक राज्य चालत आहे. सत्ताधाऱ्यांनी आपल्या इशाऱ्यानुसार राज्यकारभार करावा, नव्हे तसे करण्यास त्यांना भाग पाडावे व गरीब जनतेवरील—जी केवळ आपले जीवन तगवून ठेवण्यासाठी धडपडत आहे—तिला अंगाखांद्यावरील कपड्यांसकट लुटावे, इतकेच नव्हे तर मालकवर्गाने "कामगाराला पोटभर मिळाले, त्याचे प्रश्न सहज सुटले तर तो कामचुकारपणा करील, अर्धपोटी राहिला तर कमीत कमी उद्याच्या काळजीने आणि आशेने तरी झक मारत कामावर येईल या तत्त्वानुसार प्रजेला किंवा गरीब कामकरी वर्गाला छळून त्याची सातत्याने पिळवणूक करीत रहावे ही गोष्ट राजकारणाने सध्याच्या युगात जीवनव्यवहाराच्या सर्वच क्षेत्रांवर कितपत पगडा बसविला आहे हे सिद्ध करते. आजच्या युगात राजकारणाच्या ह्या प्रवृत्तीमुळे सत्ताधारी वर्ग आणि सर्वसामान्य जनता अथवा प्रजा यामध्ये अतिशय महान वैमनस्य निर्माण झाले आहे आणि या वैमनस्याचा ऐतिहासिक परिपाक म्हणूनच की काय आजच्या तरुण पिढीमध्ये एक प्रकारची प्रस्थापितांविरुद्ध आवाज उठविण्याची प्रवृत्ती अतिशय जोमाने फोफावली आहे. भारतापुरतेच अथवा महाराष्ट्रापुरतेच बोलावयाचे झाले तर अशा तऱ्हेची बंडाची नुसतीच आरोळी नाही तर रणभेरी केशवसुतांनी आपली तुतारी फुंकून साहित्यक्षेत्रात एका नव्या जोमाची, नव्या उत्साहाची लाट निर्माण केली आणि पांडित्याकडून बहुजनसमाजाच्या सुबोधतेकडे, क्लिष्टतेकडून व्यावहारिक स्पष्टतेकडे, विरक्तीकडून जीवन आणि संसाराकडे, अध्यात्माकडून आधिभौतिकाकडे पहाण्याची एक जीवनविषयक दृष्टी महाराष्ट्रीय जनतेला दिली. केशवसुतांनी साहित्यक्षेत्रात विशेषतः काव्यप्रांतात एक बंडखोर परंपरा निर्माण केली तर बी कवींनी (नारायण मुरलीधर गुप्ते) अध्यात्मिक पुनरुत्थानाची ग्वाही देत असतानाच आपल्या प्रखर आणि प्रचुर भाषाशैलीने गहनगूढ अशा अध्यात्मिक मौलिक गुणांना अत्यंत सहजतेने सर्वसामान्य जनतेपर्यंत पोहोचविले हे त्यांच्या पिंगा, चाफा वगैरे कवितांवरून सहज समजण्यासारखे आहे.










अनुक्रमणिका

## बंडाच्या आरोळ्यांची टीशी कशाला?

जागतिक पार्श्वभूमीवर आणि भारतीय समाजजीवनाच्या एका विशिष्ट कालखंडामध्ये ही बंडाची लाट सर्व भारतभर आणि महाराष्ट्रभर पसरली आणि परतंत्र भारताला स्वतंत्र करण्यासाठी सारा भारतीय गरीबवर्ग–तेल्या-तांबोळ्यासकट–उभा राहिला. शतकानुशतके घोरत पडलेला भारतीय जनरूपी महामानव खडबडून जागा झाला. जगात सर्वत्र अत्यंत द्रुतगतीने घडणाऱ्या ऐतिहासिक घटनांच्या मालिकेत भारताला स्वातंत्र्य मिळणारी एक घटना घडली आणि हां हां म्हणता असा एक कालखंड निघून गेला की ज्या कालखंडामध्ये एक कलावंतांचा वर्ग निर्माण झाला नि त्या वर्गाने प्रस्थापितांविरुद्धच आपला मूळ पवित्रा रोखला. या प्रश्नामध्ये ज्या आरोळ्यांचा उल्लेख आहे तो वर वर्णन केलेल्या प्रथितयश समाजधुरीणांच्या बाबतीत नसावा, परंतु आज जे नवनिर्मितीबद्दल एक प्रकारचे फॅड, फॅशन थोडक्यात म्हणजे नेहमीच्या अथवा दैनंदिन साच्यापेक्षा जरा वेगळ्या स्वरूपाचे असे जे काहीतरी करण्याची धडपड करीत असणाऱ्या बंडखोर तरुणांचे कर्तृत्व अशा अर्थाने गृहीत धरावयास हरकत नाही. अशा प्रकारच्या आरोळ्या जर जुन्याच्या मूळ रूपात आमूलाग्र बदल करून सर्वसामान्य जनतेच्या उद्धारासाठी संपूर्णतया नूतन स्वरूपाची जीवनदृष्टी, जीवनव्यवहाराचा नवा आविष्कार देण्यासाठी असतील, समाजधारणेच्या नव्या पुरोगामी तात्त्विक अधिष्ठानाच्या बैठकीवर त्या आधारीत असतील तर त्या अत्यंत योग्य, कौतुक करण्यासारख्या आणि प्रोत्साहन देण्याजोग्या आहेत असे कोणीही मान्य करील.

स्वतःला बंडखोर म्हणविणाऱ्या तरुणांच्या आचार-विचारांना काही तात्त्विक अधिष्ठान आहे असे आपणांस वाटते काय? या आपल्या दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर होकारात्मक किंवा नकारात्मक कोणतेही दिले तरी प्रश्नाची तीव्रता कमी होण्यासारखी नाही किंवा परिस्थितीमध्ये फारसा बदलही होण्यासारखा नाही; परंतु अखेरीस (आजचा बंडखोर हा उद्याचा प्रस्थापित ठरत असतो) हे वाक्य घातले आहे ते मात्र जरा बारकाईने विचार करण्याजोगे आहे.

बंडखोरी अथवा प्रस्थापितांचे वजन झुगारून देण्याची वृत्ती प्रत्येक देशात आणि प्रत्येक युगात निर्माण झालेली आहे आणि ऐतिहासिक गरजेतून ती निर्माण झाली आहे. स्वतःला बंडखोर म्हणविणारे या एकाच उपाधीवरून दुसऱ्यानेही आपल्याला बंडखोर म्हणावे अशी इच्छा बाळगणारे, रॅडिकल, रिव्होल्यूशनरी, वगैरे नवतेच्या नवतेविषयी जे अनेक वाद निर्माण झालेले आहेत त्यापैकी एका मार्गाचा अवलंब करणारी मंडळी अर्थात् ज्यांच्या बाबतीत राजकीय पार्श्वभूमी आहे त्यांच्या बाबतीत कम्युनिस्ट, सोशलिस्ट, रॉयिस्ट, गांधीवादी व आजच्या दिवसात इंडिकेट-सिंडिकेटवारी वगैरे कोणत्या ना कोणत्या वादाचे बिल्ले आपल्या छाताडावर लावणारे असेच मी समजू शकेन. अशा व्यक्तींचे तात्त्विक अधिष्ठान त्यांच्या आयुष्यक्रमात, जीवनव्यवहाराच्या प्रकारात, त्यांच्या कलाकृतीत अथवा बोलण्या-चालण्यात दिसून येते; पण अखेरीस ही सर्व धडपड केवळ आपणास काही स्थान प्राप्त व्हावे यासाठी असावी वा नसावी याबद्दल मात्र दुमत होऊ शकेल आणि ते दुमत व्यक्ती-व्यक्तीनुसार बदलत जाईल. भारतीय तरुणांमध्ये तत्त्वज्ञानाची तर गोष्टच नको, परंतु अनुभवाचा उथळपणा आणि वागणुकीतील कृत्रिमता इतक्या थराला पोहोचल्या आहेत की कधी कधी तर ह्या 'अँग्री यंग मॅन'ची टोळी म्हणजे कदाचित भैरवपंथी परंतु वेगळ्या वेषातले भगवानालासुद्धा 'यह है भी कौन और किसका बच्चा' असे वाटणारी असल्यामुळे मंत्र, तंत्र आणि यंत्रादि साधनांनी पूर्णपणे बांधलेला असा वाटतो. अर्थात् हे विधान सर्वांनाच सरसकट लावता येणार नाही. आंधळे आणि हेतूशून्य अनुकरण करणाऱ्यांच्याच बाबतीत हे विधान योग्य ठरेल.

तात्त्विक अधिष्ठान ही गोष्टच आजच्या युगात अशक्य आहे. तिथे तत्त्व नावाची गोष्ट शिल्लक नाही. बंडखोर म्हणविणारा असा एखादा तरुण जर सातत्याने त्याच क्षेत्रात एकतप घालविण्यात मग्न असेल व त्याच्या जीवनविषयक विचार-आचार-प्रणालीत फारसा बदल न होता जर त्याची पूर्वीची धडाडी, निश्चय, प्रेरणा अशाच टिकून राहिल्या असतील तर एका विशिष्ट तात्त्विक अधिष्ठानाने एक बंडखोर तरुण आपल्या क्षेत्रामध्ये जीवनाची वाटचाल करीत आहे असे म्हणता येईल. त्याला पटलेल्या मार्गाने तो आपल्या जीवनाची वाटचाल करीत आहे, जीवनाचा प्रत्येक क्षण आपल्या कार्यासाठी वेचत आहे, तन-मन-धनाने तो आपल्या स्वीकारलेल्या तत्त्वांच्या उत्थापनासाठी सातत्याने धडपडत आहे, तळमळत आहे असे निश्चितपणे कोणालाही ते मान्य करावे लागेल.

आजचा बंडखोर हा उद्याचा प्रस्थापित ठरत असतो हे विधान जरा वैचित्र्यपूर्ण आहे. बंडखोरी अथवा अन्यायाविरुद्ध स्वतःचे तन-मन-धन वेचण्याची ज्वलंत निष्ठा आणि धडाडी, निश्चय, विचारांची पात्रता हे अत्यंत मौलिक गुण आज आपल्याकडे केवळ दुर्मिळच नाहीत तर जवळजवळ असंभवनीय ठरले आहेत. त्यामुळे आज आणि उद्याच्या मध्यंतरीच्या कालखंडातील त्या तरुणाचे जीवन, त्याची दिशा केवळ काळच ठरवीत असतो. त्याच्या विशिष्ट, विविक्षित आणि समाजाला वैचित्र्यपूर्ण वाटणाऱ्या धडपडीचा मागोवा घेत, त्याच्या पराकाष्ठेच्या विविध प्रयत्नांना आणखी तेजोमय पैलू निर्माण करून त्याच्या व्यक्तिमत्वाची प्रभा पसरवून त्याला पुढे जाण्यासाठी चेतना देणे किंवा त्याच्या अपार प्रयत्नांना निमिषार्धात नामशेष करून त्याच्या स्वतंत्र आणि प्रतिभावान कर्तृत्वावर बोळा फिरविणे या गोष्टी 'कालाय तस्मै नमः'मधील कालच ठरवीत असतो; म्हणूनच आजचा बंडखोर उद्याचा प्रस्थापित ठरत असतो हे विधान एकतर्फी म्हणणे भाग पडते आणि मागे चर्चिलेल्या परिच्छेदातील राज्यकर्ते-शासनकर्ते असाच अर्थ प्रस्थापित या शब्दाने व्यक्त केला जातो. सर्वसामान्यपणे जगात सगळीकडे हेच आहे. त्यामुळे समाजाकरिता, समाजाकडून आणि समाजाची अशी शासनपद्धती हेच तत्त्व अतिशय प्रगल्भतेने चमकत








असल्यामुळे प्रत्येक देशाच्या देशवासीयांनी आपली उन्नती त्या मार्गाने त्यांच्या विशिष्ट शासनपद्धतीने अंगिकारलेल्या तत्त्वांच्या भक्कम पायावर आणि अत्यंत पराकाष्ठेच्या प्रयत्नांनी साधून घेतली आहे. त्या त्या देशातही राज्यकर्त्यांना हात टेकावयास लावणारी अशी बंडखोर मंडळी प्रत्येक देशात आहेत व ती बंडखोर मंडळी निर्माण व्हायला खरी सुरवात पहिल्या आणि दुसऱ्या महायुद्धकालानंतर झाली.

## महायुद्धांचा निसर्गावरही परिणाम

जागतिक इतिहासात या दोन महायुद्धांनी मानवी जीवनाच्या प्रक्रियेत आमूलाग्र बदल घडवून आणला इतकेच नव्हे तर जितक्या प्रमाणात तो बदल मानवी जीवनात घडला त्याच्या कित्येक लक्ष पटींनी वेगवान आणि तेजवान वनस्पतीसृष्टी, प्राणीसृष्टी, जलचर सृष्टी, वगैरे विश्वातील अनेक सजीव-निर्जीव सृष्टचांमध्ये आणि अंतरिक्षातही घडवून आणला. हिरोशिमा-नागासाकी या दुसऱ्या महायुद्धातील भयानक हत्याकांडाचे वर्णन वाचून अंगावर रोमांच उभे राहतात, तर त्याची रसभरीत वर्णने रंगवून सांगणारेही सापडतात. एकूण तात्पर्य, समाजातील समंजस आणि विचारी तरुण वर्गाला, जगातील प्रत्येक कलावंताला आज एकच पोटतिडीक आहे, मग तो साहित्यिक, चित्रकार अथवा संगीतज्ञ कोणीही कलावंत असो ! फ्रीडम, फ्रीडम, आय अॅम फ्री टु एक्स्प्रेस व्हॉट आय फील." आज स्वातंत्र्याचे युग आहे. प्रत्येकाला लिहिण्याचे, बोलण्याचे आणि वाचनाचे स्वातंत्र्य असताना आपल्या प्रतिभेच्या स्वैर विहाराला आळा घालून आमची प्रतिभाशक्ती खुंटविण्याचा कोणाला अधिकार आहे अशा थाटात कलाकृतींची निर्मिती करणाऱ्या कलावंतांचा वर्ग. यांचे तत्त्वज्ञान म्हणजे हेन्री बर्गसॉचे फ्री विलचे तत्त्वज्ञान व यांच्या जीवनाच्या तत्त्वज्ञानाचे सूत्र म्हणजे स्वतंत्र भावाविष्कार (फ्री एक्स्प्रेशन). थोडक्यात म्हणजे व्यक्तिनिष्ठ दृष्टीकोनातून समष्टी निष्ठेवर कोरडे ओढणाऱ्यांचे तत्वज्ञान. असो ! निराशावादाची परिसीमा एकीकडे आणि आशावाद व काल्पनिक निशाणबाजी हे दुसरीकडे, एवढी विशाल दरी आज तरी बंडखोर म्हणविल्या जाणाऱ्या किमानपक्षी भारतीय तरुणांमध्ये आहे. नियतीनेच विनाशाकडे खेचला गेलेला मानव आज नशापानाच्या आणि नशेतून निर्माण होणाऱ्या नशामय विश्वाच्या वैयक्तिक जीवनात इतका गुरफटून गेला आहे आणि इतक्या वेगाने फेकला गेलेला आहे की जीवन ही सुद्धा आजकालच्या दिवसात एक नशा होऊन बसली आहे. स्वतःच्या जीवनाचा वितर हा विरंगुळा आज मानवाला नाही. प्रत्यक्ष मृत्यूचा संहाराचा हात एका खांद्यावर आणि दुसऱ्या खांद्यावर जीवनाच्या ओझ्याचे गाठोडे, ज्यात आयुष्यातील सर्व पुण्याई साठवलेली आहे. अशा अवस्थेत आज मानवी जीवनाचा अनुभव घेणारा हा दोन पायांचा बुद्धीमान प्राणी आपले एक एक पाऊल टाकायचा प्रयत्न करीत आहे. त्या पदन्यासामधला तोल सावरण्याचा प्रयत्न करीत आहे. त्याचे चालते बोलते उदाहरण म्हणजे आजचा जागतिक बंडखोर तरुण. जगातील इतर कोणत्याही देशातील बंडखोर तरुण आणि भारतीय बंडखोर तरुण यातील अंतर वर वर्णन केल्याप्रमाणे आहे.

व्हिन्सेंट व्हॅन गॉफसारखा चित्रकार जीवनातील आयुष्यात ज्याला जगाने वेडा ठरवला, पोरांनी त्याच्या अंगावर दगड फेकले, चित्रकारांनी हिणविले, दुनिया तुच्छतेने पाहू लागली, त्यालाच माया नावाच्या एका दैवताने सदेह रूप धारण करून दर्शन द्यावे, साक्षात्कार द्यावा, आयुष्यातील एकच क्षण इतका उजळ करावा की दुसऱ्या क्षणापासून त्याच्या जीवनाचा खराखुरा जागता बोलता इतिहास सुरू व्हावा. निसर्गप्रेमाने वेडा झालेला आणि स्वैराचाराने धुंद झालेला दुसरा चित्रकार गोगँ याने ताहितीच्या नेटीव्हवर प्रामाणिक प्रेम करून तिच्याशी संसार थाटावा आणि स्वतःच्या झोपडीच्या भिंतीच (भिंतीसुद्धा नाहीत तर शब्दशः आणि अक्षरशः तालपत्री) आपल्या कुशल कुंचल्यांनी रंगवून जगातील सप्तस्वर्गाचे सौंदर्य आपल्या इवल्याशा पर्णकुटीत निर्माण करावे—सॉमरसेट मॉमसारख्या जगद्विख्यात लेखकाने ते मौलिक अनुभव ग्रथित करून 'मून अॅण्ड दी सिक्स पेन्स' या कादंबरीमध्ये याचे प्रत्यक्ष चित्रण मौखिक स्वरूपात वाचकांच्या डोळ्यासमोर उभे करावे ही ठरेल सर्वसामान्यपणे बंडखोरीची कसोटी. आणि ऐतिहासिक अपघाताची गोष्ट अशी की या दोन्ही चित्रकारांना आपण एखादी युनियन बांधावी, संघटना काढावी, नवचित्रकारांच्या आयुष्याला वाव देणारी, त्यांच्या सुखदुःखांकडे लक्ष पुरविणारी, त्यांच्या अडीअडचणींसाठी पुढे धावून येणारी अशी प्रातिनिधिक स्वरूपाची जागतिक संघटना असावी असे या दोघांनाही तळमळीने वाटत होते. ही त्या दोन जगप्रसिद्ध चित्रकारांच्या आयुष्यात घडलेली घटना, यामध्येच नवीनतेच्या चळवळीची मूळ बीजे रोवली गेलेली आहेत.

(पृष्ठ ४६ वर पहा)

**होळी रे होळी ! बोंम्, बोंम्, बोंम्....**



**अजय : तुमच्या नांवाने उपवास करीन !**






“ गधड्या तू ‘ महिला जगत् ’मधलं वाचलंसं होय? मग गर्भारपणात घ्यायची काळजी, अधिक दूध येण्याचे उपाय, बालसंगोपन, हे पण सारं वाचलंच असशील ? ... आजी कडाडली. ... आता निमूट्या बडलांनी चाणाक्ष व्यवहारी जावई म्हणून माझी निवड केलीय् ...




— मनोहर रा. शुक्ल

आजोबा मुंडासं गुंडाळून बसले होते. त्यांनी “म्यॉंव्” आवाज काढताच मी आधी सांगितल्यानुसार चलाख चेहरा करून आत गेलो.

“काय आजोबा, बटाटे कसे किलो ?”

“गधड्या, आजोबा नाही, भाजी-वाल्या.” पण आजोबा मोठे. त्यांना शेवटी वाल्या कसा लावायचा ? —

“काय भाजीवालेसाहेब —”

आजोबांनी मुंडाश्यासकट उडी मारून कान पकडला — “मूर्खा ! भाजीवाल्याला साहेब म्हणशील तर किलोवर चार आणे भाव चढेल ....”

शेवटी रंगीत तालीम एकदाची संपली. छे ! चांद्रयानाचे वीर तरी काय सजत असतील. पिशव्यांची कवच-कुंडलं मी धारण केली. चतुर संभाषणाचे तोफगोळे तोंडात घोळवत निघालो — बाजाराचं रणमैदान !

ते गाजवून परत आलो. पावलं सरळ पडत नव्हती. अहो, भरगच्च पिशव्या पाठीवर. पण त्यांची भ्रान्त नव्हती. निमूट ओझी वाहणं, यात मी इतकं प्रभुत्व मिळवलं होतं, की नोबेल पारितोषिक त्या विषयावर ठेवलं असतं, तर पटकावलं असतं मीच ते.

स्वयंपाकघरात साऱ्या पिशव्या पटकून मी पुढं काय प्रतिक्रिया होते ते हेरण्यासाठी कोठीतल्या पिंपामागे कान टवकारून बसलो. थोड्या वेळानं शब्द आले —

“हात् मेल्याचं लक्षण ! किती आळ्या नि कोळीष्टकं या तांदळात नि खडे तरी किती या गव्हात ! आवाज आजीचा. “कुठांय् तो हरामखोर ? ” — आजोबांची गर्जना घुमली. — “चार जुड्या कोथींबीर ? ” अरे मेथी आणायला सांगि-तली होती नं ... आणि हे काय धान्य का जनावरांची चंदी ? ”

माझी पार गाळण उडाली. सरहद्दीवरचे सैनिक तरी सुखानं झोपत असतील. पण आमचं घर ! त्यातले आजोबा, बाबा, नि आजी — साऱ्यांनी माझ्या रोखानं फोडलेले आपटबार — मूर्ख, गाढव, बावळट, अक्कल-शून्य ... आणि अनेक अगणित !

हे मोठे लोक सोयीस्करपणं विसरतात अशा वेळी की आपल्याच रक्तातले सारे गुण मुलांमधे उतरलेले असतात.

पावलांचे दणादण वाजणारे आवाज जवळजवळ आले. सराईत तीक्ष्ण नजर सभोवार भिरभिरत होती. जंगलातल्या भित्र्या ससासारखी माझी स्थिती होती. छाती धडधडत होती. चौकस कान टवकार-लेले. फक्त त्याच्यासारखा टुण्कन् उडी मारून मी पळून जाऊ शकत नव्हतो.

गचकन् मानगुट पकडली गेली — “का रे, मघापासून एवढा बोंबलतोय् तुझ्या नावानं. चाल् मुकाट्या स्वयंपाकघरात आणि बघ तुझा प्रताप मग आमची नेहमीची मिरवणूक निघाली. मी पुढे, माझाच पण आजोबांचा अति आवडता कान त्यांनी पिळलेला. या सोहोळ्याला

माझ्या मुसमुसण्याची बारीकशी पिपाणी साथ देत होती. पाठीवर आजोबांचा दुसरा हात तबल्याची अनोखी अदा वाजवत होता.

स्वयंपाकघरात आमचं आगमन होताच आजीनं हात ओवाळले. तसा आजोबांच्या धपाटयाचा प्रसाद मिळाला.

"कुठून आणली ही जनावरांची चंदी ?"

"बाजारातून. एक माणूस ओरडत होता – की हे धान्य बघा. देशातली आम जनता हेच सारं खाते. माझं मन सामान्यजनांच्या प्रेमानं भरून आलं. सारं धान्य तिथंच मी घेतलं . . . . "

"वॉ वॉ वॉ वॉव् ! म्हणजे आपण चिरंजीव मोठे फुडारी होणार. नि आमचे जन्माचे पांग फेडणार . . . . . "

ते थोडा वेळ थांबले. ओरडून ओरडून आलेला घाम त्यांनी धोतराच्या सोग्याला पुसला. नि का कोण जाणे, ते तरातरा निघून गेले.

"आज्जी. लोण्च्याचा नम्मुना आणलाय् " किती गोड शब्द ! अहाहा. समोरच्या जोशांची निमा. मी मनातल्या मनात देवाची प्रार्थना केली – "देवा ! बावळट, मूर्ख असं म्हणायची आजीला यावेळी तरी बुद्धी देऊ नकोस."

"बस ग निमा." मग माझ्याकडं वळून– "गद्-ध्या, बावळटा, हात टेकले बाबा तुझ्यापुढं. मेथी आणायला सांगितली तो कोथिंबीरच चार जुडया आणून ठेवलीस. आता कोण खाणार एवढी ?"

मी काकुळतीनं म्हणालो – "अग, परवाच्या महिलाजगतच्या मासिकात आलेली कोथिंबिरीची भजी न् वडे कर न."

"गधडया, तू महिला-जगत् वाचलंस् होय ? मग कोथिंबिरीच्या भज्यांबरोबर गर्भारपणात घ्यायची काळजी, दूध येण्याचे उपाय, बालसंगोपन, सारंच वाचून मोकळा झाला असशील . . . . . "

"नाही ग आजी, फक्त भजीच वाचली."

"असं ना. उद्या तुझी बायको आली म्हणजे करून घालील तुला भजी. तेव्हा चार काय, दहा काय, गाडा भरून कोथमिरीच्या जुडया आण. बावळट कुठला !"

आणि अचानक काच फुटावी तशी निमी खळ्कन् हसली. मला खूप वाईट वाटलं. हा बावळट शब्द – माझ्या चारित्र्यावर पेनमधून मधेच ओघळणाऱ्या शाईप्रमाणं डाग पाडणारा–शब्दकोशात कुणी घातला ?

मी बाहेर जाऊन उभा राहिलो कोपऱ्यात. तो मागून निमा आली. रुणझुणत्या आवाजात म्हणाली – "मी घालीन रे करून तुला कोथिंबिरीची भजी. तू कित्ती कित्ती छान दिसतोस रे. आजीनं बावळट म्हटलं की, लाखाच्या गोष्टीतल्या राजा गोसाव्यासारखा." आणि चोरटेपणानं पाहून ती पळून गेली.

मी फुललो. गबाळेपणाच्या जखमेवर निमीनं मलमपट्टी केली प्रेमाची. तुळशीदास सापावरनं – तसा मी गबाळेपणाच्या दोरावरून पोहोचलो, तो थेट निमाच्या चोरकप्पात – मनातल्या.

बाबांचा आवाज आला – "अहो चिरंजीऽऽव ! चिंतोपंतमहाराज. कुठे असाल तिथून प्रकट होऊन आम्हाला दर्शनाचा लाभ द्या."

मी सारे अभिनय पणास लावून शेपूट घातलेल्या कुत्र्यासारखा लाचार मुद्रा करून उभा राहिलो.

"हं. हे घ्या पुस्तक. वरचं नाव काय आहे ?"

"व्यवहाराचा वाटाडया नि थापाडया."

"ठीक ! लेखक ?"

"सहस्त्रबुद्धे."

"हं. पान उलटून आतली अर्पणपत्रिका वाचा."

"व्यवहार-शून्य बांधवास केवळ – हे पुस्तक वाचून – अल्पशी जरी अक्कल आली, तरी लेखक धन्यता पावेल."

"हं. तर करा सुरुवात आजपासून वाचायला. आणि हे पहा. तुला बाजारहाटाची खूप संधी दिली ; पण तू सिद्ध केली ती तुझी नालायकी ! तेव्हा शेजारच्या बन्याला उद्यापासून तुझा गुरु नेमलाय्. तो कसा अगदी चलाख, तरतरीत आहे. तसा हो."

बन्या ! लहानपणापासूनचा प्रतिस्पर्धी ! नि माझा गुरु ?

दुसऱ्या दिवसापासून तो बाजारी शिक्षक म्हणून येऊ लागला. कधी तो बरोबर चालत नसे. साहेबाच्या ऐटीनं छाती काढून पुढं चालायचा. पैसे खिशात घालून, पिशव्या घेऊन मी शिपायाप्रमाणं मागं. मुठी वळल्या जायच्या. बन्याची साल्याची मान मुरगाळावी ! पण आजोबा-बाबांचे चेहरे दिसायचे. नि मी चूप !

सारे, सारे माझे शत्रू झाले होते. आधार फक्त जबरदस्त निमाचा ! मी मॅट्रिक मागच्या वर्षी पास झालो हे साऱ्यांना जगातलं महान आश्चर्य वाटत असे. शाळांत परीक्षेचा मी तहहयात सभासद होणार असं साऱ्यांना वाटत असे. पण पास झालो पहिल्याच फटक्यात. तरी बेकारीचं मानगुटीवरचं भूत उतरायला तयार नव्हतं. . . .

हे सारे विचार मनात चालू असता आवाज आला – "बाब्याऽऽ ! !" निमीचे वडील. ते बैठकीत आजोबा नि बाबांजवळ जाऊन बसले. मी उंबरठयाजवळ कान टवकारून अंदाज घेऊ लागलो –

"बाब्या. नेहमीसारखा नाही आलो आज. एका खास कामासाठी मी हादरलो. आमचं प्रेमप्रकरण यांच्या कानावर गेलं की काय ?

"अरे आमची निमूबाई आता सत्राची झाली. तेव्हां म्हटलं तिला योग्य स्थळं . . !"

"मी आहे ना . . . ! वारं झपाटल्यासारखा मी पुढं होऊन म्हणालो. ते गडबडून म्हणाले – "तू ? तू काय ?"

"म्-म्-मी प्-पाहीन स्थ-स्थळं." बाबा गरजले – "चड्डीचं बटण लाव. खालचं आधी. गद्धा साला. याचा कशाला पत्ता नाही नि निघाला स्थळं सुचवायला !"

मी काढता पाय घेतला. काळजाचं पाणी पाणी झालं. प्रेमाचं पान, मसालेदाऽऽर ! कुणी उपटसुंभ ऐताच लज्जत लुटणार का ?

निमूचे वडिलही पक्के व्यवहारवादी. मी त्यांच्या घरासमोर उपोषण करून मरायला टेकलो असतो तरी निमूची भीक त्यांनी माझ्या शर्टात घातली नसती










निमाच्या संयोगितेला हस्तगत करायला पृथ्वीराजाप्रमाणं मलाही एका घोड्याची जरूरी होती. व्यवहारदक्षतेचा नाठाळ घोडा ! त्यावर स्वार झालो की माझ्याच तोंडाला फेस आणणारा. नखराळ चालीनं माझी हाडंहाडं खिळखिळी करून टाकणारा. पण ! याच घोड्यावर माझी प्रेमाची रेस अवलंबून होती. आता रेसभरही मागं सरायचं नाही असा निश्चय केला. परत व्यवहाराच्या चिक्कण मातीत उडी ठोकायचं ठरवलं. काहीतरी किमया करून निमूच्या वडलांच्या नजरेत भरायला हवं होतं.

आणि

एका महिन्यात मी साऱ्यांच्या कौतुकाचा विषय बनलो. यक्षिणीची कांडी फिरावी तसा माझ्यात बदल झाला. प्रत्येक चीजवस्तू इतक्या स्वस्तात मी आणू लागलो की आजोबांना व बाबांनाही ते कधी जमलं नव्हतं. नवा पैसा माझ्यावरून ओवाळून आजीनं माझी दृष्ट काढली.

गरभारशीच्या अंगावर आगळी कांती झळकावी, त्याप्रमाणं माझ्या अंगा-खांद्यावर पुन्हा पिशव्या-पोती झळकू लागली. कारण साऱ्या आळीचं व्यवहारदक्ष म्हणून मजकडं लक्ष वेधलं. बाजार करावा तर, चिन्त्यानंच ! – ही नवी म्हण ओठाओठांवर खेळू लागली. बाबा नि आजोबा – जे इतके दिवस माझ्या चितेनं तळमळत होते – आता शांतपणानं झोपून घोरू लागले. बाबांनी तर व्यवहाराचा वाटाड्या व थापाड्याचे लेखक महाशय सहस्रबुद्धे यांना खास प्रशस्तिपत्रक पाठविले – की जगायला सर्वस्वी नालायक व व्यवहारशून्य असा माझा मुलगा, नामे चिन्तामणि, आपल्याच पुस्तकाच्या वाचनाने सुधारला.

पाठीवर पिशव्या नि पोती याशिवाय हा चिन्तामणि कधी मोकळाचाकळा दिसेचना. बडाराच्या गाढवासारखा. समाजसेवक हे गोंडस नाव मला पडलं. साऱ्या चाळकऱ्यांचं रेशन, किराणा, भाजी, गोवऱ्या, कोळसे, लाकडं दिवसभर वाहून रात्री मी आडवा झालो नि मला माझ्या नि निमाच्या लग्नाचं स्वप्न पडलं की पताकांच्या जागी पिशव्या नि अंतर्पाटाच्या ठिकाणी पोतं दिसत असे.

ही घोर तपश्चर्या केवळ निमूच्या वडलांच्या नजरेत भरण्यासाठीच होती. त्यासाठी एक मोठं अग्निदिव्य मी पत्करलं होतं. मित्राकडे पत्ते कुटायला जातो म्हणून सांगून मी एका शेठच्या पेढीवर जात असे. इन्कमटॅक्स चुकवण्याच्या चोपड्या खरडण्यासाठी. महिना पन्नासचा करार होता. रात्री दीडदोन वाजता घरी येई. त्या उत्पन्नाची भर घालून मी साऱ्या स्वस्त सांगितलेल्या भावांची भर काढीत असे. घारूअण्णांसाठी बारा आणे किलो घेतलेले पेरू मी चक्क सहा आणे किलो सांगत असे. सहा आणे पदरचे घालीत असे. माझं तुटीचं अंदाजपत्रक असं होतं.

निमूच्या वडलांनी एकदा बोलावलं. निमू वयात आली म्हणून तिला ते तिच्या मैत्रिणीशिवाय इतरत्र कुठं जाऊ द्यायचे नाहीत. आळीतली सारीच पोरं वाह्यात असा त्यांचा समज होता. काहीतरी कारण काढून गेलेल्या बन्याला दम भरून त्यांनी बाहेर काढला होता. आणि मला तर आज स्वतः होऊन त्यांनी आमंत्रण दिलं होतं. मी गेलो.

"हे पहा चिन्तू. आज निमूचे मामा जेवायला येणारायत् त्यांना पालकाची भाजी फार आवडते. गावच्या सातआठजणांसह येतील. तेव्हा चांगल्या आठ जुड्या पालक घेऊन ये." मी म्हटलं – मनात, निमीच्या पालका ! आज पालक पदरात घाळतो. उद्या निमीचा नवरा झाल्यावर तुम्ही कितीही – दो या तीन बरस – म्हणून ओरडला, तरी आठ बालकं पदरात घालीन .........

बाजाराकडे निघाल्यावर चुकल्यासारखं वाटलं. अरेच्या ! पिशवी नाही घेतली बरोबर ! शेवटी आठ जुड्या पालकाच्या, सुतळीनं बांधून निघालो. मागे काही ओरडल्यासारखं वाटलं. वळून पाहिलं तो वळू ! मस्त माजलेला. मी पळत सुटलो. नि ते आडदांड जनावर मागे. क्षण एक थांबलो असतो तर . . . ! रस्त्यावरचे सारे डोळे भरून पहात होते. हसत होते. मला धाप लागली होती. पोटऱ्यात गोळे आले होते. जरा वेग कमी झाला की मागच्या सदऱ्याला त्याचा उष्ण फुरफुराट लागत असे. एकदा तर शिंगही लागलं. मी जीवाच्या आकांतानं धापा टाकीत पळणारा. माझ्या मागं तो मस्त पोसलेला वळू. त्याच्यामागं टारगट पोरांचा घोळका अशी धिंड निमूच्या घरापर्यंत आली. पायरीशीच वळूमहाराजांनी जो शिंगाचा प्रसाद दिला तो पालकासकट निमूच्या पुढ्यात जाऊन पडलो. साऱ्या अनपेक्षित प्रकारानं तिच्या हातातून गळून पडलेला सुईदोरा मला मागे टोचत होता. काही व्यक्त करण्याच्या पलिकडं माझी अवस्था होती. धपापणारा छातीचा भाता. तोंडातून चित्रविचित्र फूत्कार. दोनदा शिंग खाल्लेली पाठ. आणि पृष्ठभागात रुतलेला सुईदोरा ! नुसती तडफड.

निमू घाबरली. तिनं माझं मस्तक मांडीवर घेतलं. हळूवार गोंजारलं. तळमळत मी तिच्या वडलांची चौकशी केली. तो – घाबरू नकोस. चांगले तासाभरासाठी बाहेर गेलेत म्हणून सांगितलं.

हळूहळू आमची गाडी रुळावर आली. उपटलेली सुई, प्रेमाचं प्रतीक म्हणून तिनं जपून ठेवली. पालकाचे पैसेच पडले नाहीत, मित्राच्या बागेतून आणल्या म्हणून मी सांगितलं. घरी येऊन पांघरुणात शिरून बसलो. साऱ्यांना कामाना नकार दिला. अंग ठेचाळलेलं होतं तरी मन सुखावलेलं समोरच्या सत्यवान-सावित्रीच्या कॅलेंडराला मनोभावे नमस्कार केला. असंच निममाझं











मस्तक मांडीवर घेऊन बसली होती. फक्त मी मेलो नव्हतो. मरणार होतो.

परत सायंकाळी निमूच्या वडलांचा निरोप आला तसा मी बुचकळ्यात पडलो. आता हा म्हातारा सकाळी शेणगोळ्यापासून रात्री अंथरुण घालेपर्यंत कामं करायला लावतो की काय? गेलो झालं.

"एक काम आहे रे चिन्तू. हे खटावचं पातळ पहा. निमूच्या मैत्रिणीचं. असंच पाहिजे म्हणून त्रागा करून निमा गेलीय् त्या कुळकर्ण्यांच्या शैलाकडे —"

"हं त्या सुमा देशपांडे नि अंबू उचापतेच्या मधलं घर —"

"तुला, रे काय माहीत?"

"नाही सध्या गुंड-पीडित-तरुणी-संरक्षक-मंडळ काढलंय्. प्रत्येक मुलीला फुलासारखं जपून घरी पोचवायचं."

"शाब्बास! आम्हीही आमच्या तरुणपणी असंच एक मंडळ ..." आणि त्यांनी जीभ चावली. "बरं. हे घे साडेएकोणीस रुपये. असंच बाजारातनं विकत घेऊन निमाला घेऊन ये, पातळासह."

अहाहा, जीवनाची लॉटरीच का लागलीय् आज? जाता जाता बजरंगाचं देऊळ सोडून कृष्णाला भक्तिभावे नमस्कार केला. दयाघना श्रीकृष्णा. अशीच पातळं निमासाठी आणायची भविष्यकाळात संधी दिलीस, तर पातळ पुरविण्याच्या बाबतीत तुलाही फिका पाडीन.

तसंच पातळ घेऊन निमाच्या मैत्रिणीकडे गेलो. बरोबर एकोणीस रुपये पन्नास पैसे किंमत.

"अय्या! तू कसा इकडे?"

"गम्मत आणलीय् बघ तुझ्यासाठी." असं म्हणून मी ते पातळ तिच्या पुढ्यात केलं.

"निमे. आहेस ग खरी भाग्यवान्." शैला कुळकर्णी तिला कोपरखळी मारून म्हणाली. पोरींची जातच एकूण चावट. नंतर तिनं विचारलं. "केवढ्याचं हो?"

"बाजारात एक गाडीवाला स्वस्त दरात पातळं विकतोय्. हरएक साडी साडेदस रुपया ऽऽ. तिथून आणलं." मी आधीच ठरविल्याप्रमाणं ठोकलं.

तो काय? त्या दोघींनी चिवचिवाट करून, उडून बागडून हे ऽऽ साऱ्या मैत्रिणी गोळा केल्या. साडे दहा साडे दहा रुपयांसकट. "किती स्वस्त पात्तळ, किती स्वस्त पात्तळ ..." हे पात्तळ पात्तळ ऐकून मी पात्तळ होऊन घामानं निथळू लागलो.

आणि तो तरुणींचा ताफा घेऊन मी निघालो. असंख्य फुलांच्या हारात मान अडकल्यावर पुढाऱ्याला घाम फुटावा, तसा घाम मला फुटला. वाटेतच चमकून पाहलं — बाबा नि आजोबा मारक्या नजरेनं हेरत निघून गेले. नसती लचांडं! एका पातळामुळं माझी एवढी अब्रू जाईलसं मला वाटलं नव्हतं. वाटेत कृष्णाचं देऊळ लागलं. "तरुणींच्या कैवाऱ्या! पात्तळ पुरवतोस काय? पुरव आता ...." म्हणून तो कृष्ण वाकुल्या दाखवतोयसं वाटलं.

शेवटी बाजार आला. एक रिकामी जागा शोधणं भाग होतं. पण तऱ्हेतऱ्हेच्या वस्तूंची दुकानं भरगच्च लदली होती. मेंढरांच्या कळपासारखा भोवती तरुणींचा घोळका, त्यांनी अय्या-इश्शचं बेंबें थांबवून-'कुठाय् तो पात्तळवाला?' म्हणून विचारलं.

एक रिकामी जागा पाहून मी ओरडलो— अरेच्चा! इथंच होता तो. कुठं गेला कुणास ठाव्?"

खूप शोधूनही तो पातळविक्या दिसलाच नाही. साऱ्या नाराज होऊन परतल्या.

आता उरलो मी, निमा नि ते पातळ. निमा माझं खूप खूप कौतुक करत होती, पण बाबा नि आजोबांचे उग्र चेहरे माझ्या डोळ्यासमोर येत होते.

आम्ही निमाच्या घरी पोचलो. तिच्या वडलांना नऊ रुपये परत करून सारं पुराण वाचलं. साडेदहा रुपयात पातळ कसं मिळवलं ते सांगीतलं. तसं त्यांनी शाबासकी दिली.

घरी येताच बाबांनी मानगूट धरली. "काय रे! तुझे थेर वाढत चाललेत आज-काल. तुझा बाप तरी इतक्या पोरींच्या घोळक्यात कधी फिरला होता का?"

"ते कसं मला माहीत? मी थोडीच तेव्हा —"

पुढं बोलायची संधीच मिळाली नाही. त्यांनी खूप खडसावलं नि बाहेर जायची बंदी केली.

"चिन्तू व्यवहारात सुधारला पण पोरींत घसरला" ही म्हण आळीत रुजली...

* *

वाचकहो, आजची सकाळ पिशवी भरून आनंद घेऊन आलीय्. इकडच्या विहिरीत नि तिकडच्या आडात दोन्हीकडे जीवदान. हे बघा नेमणूक-पत्र रेल्वेचं. कारकून म्हणून. आणि — हं हे पेडे घ्या आधी. तर काय? निमूच्या वडलांनी चाणाक्ष व्यवहारी जावई म्हणून माझी पसंती केलीय्. माझा एका पातळातला पराक्रम एवढा फळेलसं वाटलं नव्हतं.

आता निमूला तिच्या वडलांनी माझ्या शर्तीत घातलं की साऱ्या हमालीचा मी राजीनामा देणार! पदरचे पैसे घालून, वर भरपूर हमाली करून, इतरांना स्वस्तात जगू देणं आपल्याला परवडणार नाही आता. सासरा का असेना मग तो! आता तरुण वयातच आम्ही काशी-गया-पंढरपूर. फुकट पास मिळतात ना रेल्वेचे!

आता या तुम्ही पुढे कधीतरी, निमूच्या हातची कोथिंबिरीची भजी खायला महिला जगत्मधली!

* *














श्री. के. एल. खांडपूर
फिल्म्स डिव्हिजनचे
सध्याचे कंट्रोलर

एकविसाव्या वर्षाच्या
निमित्ताने :

# फिल्म्स डिव्हिजन

## एक रसग्रहण

**पुरुषोत्तम बावकर**

वर्षापूर्वीची गोष्ट. अन्दमान द्वीपसमूहातील लिटल् अन्दमान हे छोटेसे बेट. या बेटावर सरकारी प्रकल्पाची काही कामे चालली होती. रांचीचे मजूर येथे काम करत होते. बेटावरचे मूळ रहिवासी ओंगी. कुणीच सिनेमा पाहिला नव्हता. आमच्याबरोबर नेलेले काही अनुबोधपट या लोकांना दाखवले. काही समजले. काही समजले नाहीत.

त्यानंतर निकोबार द्वीपसमूहातील 'छावरा' या बेटावरची गोष्ट. लिटल् अन्दमानला वीज होती. पण छावरा येथे तर वीजही नव्हती. गावातील सातशे घरांपैकी काही थोडी पुरुष मंडळी निकोबारला जाऊन आली होती. बाकीच्यांना आपल्या भूमीव्यतिरिक्त काही जग आहे याची कल्पनाच नव्हती. ह्या लोकांना काही अनुबोधपट दाखवायचे होते. पण दाखवायचे कसे ? बेटावर वीज नव्हती आणि आमच्याकडे जनरेटर नव्हता. तेव्हा बोटीवरच्या डेकवरच ते दाखवावेत असे ठरले. छोटीशीच बोट. बसायला जागा नाही. अनुबोधपट सुरू करण्याआधी चौफेर चंद्रप्रकाशात पाहिले. बोटीभोवती होड्यातून माणसे बसली होती सणासुदीचे कपडे घालून. अनुबोधपटाच्या रूपानेही लोकं सिनेमा प्रथमच पहात होतो.

त्यांना 'लाहुल आणि स्पिती', 'मौजीरामची स्वप्ने' इत्यादी अनुबोधपटांबरोबरच 'हॅपी आयलंड' हा अंदमान-निकोबार बेटांवर काढलेला रंगीत बोलपट दाखवला. त्यावेळी स्वतःचा प्रवेश आणि स्वतःची माणसे पाहून त्यांनी जो जयजयकार केला तो विसरणे कठीण !

दिल्ली येथील टाळकटोरा कॅम्प. प्रजासत्ताक दिनाच्या सोहळयात भाग घेण्यासाठी निरनिराळया प्रदेशातील नृत्यपथके येतात. फार दूरवरची त्यांनी मोटर आणि आगगाडी सुद्धा पाहिलेली नसते. गेल्या वर्षाची गोष्ट. ओरिसा प्रांतातील एकी दूरच्या गावाहून एक नृत्यपथक आले होते. त्यातील लोकांनी सिनेमा पाहिला नव्हता. तीच गोष्ट नागालँडच्या नृत्यपथकाची. डिफेन्स फिल्म युनिटने जेव्हा त्यांना काही अनुबोधपट दाखवले तेव्हा त्या लोकांच्या चेहऱ्यावरील हावभाव, उत्सुकता, अजूनही माझ्या नजरेसमोर आहे.

वरील तीन उदाहरणे देण्याचं कारण, भारत सरकारचे अनुबोधपट शहरी प्रेक्षकांसाठी नसता ते जास्त करून वरील प्रेक्षकांकरता असतात, आणि नसल्यास ते असावेत, ह्याकडे टीकाकारांचे लक्ष नसते. त्यांच्या पुढे फक्त शहरी प्रेक्षक असतात.



श्री. प्रमोद पति
फिल्म्स डिव्हिजनचे
मुख्य निर्माते









अनुक्रमणिका

अनुबोधपटांचा खरा उपयोग भारता-सारख्या विकसनशील देशात, खेड्या-पाड्यातील लोकांच्या ज्ञान-प्रसारासाठी आहे, हे महत्त्वाचे आहे. त्या दृष्टीने फिल्म्स डिव्हिजनचे कार्य अवश्य पाहिले पाहिजे.

फिल्म्स डिव्हिजनची सुरुवात केव्हा आणि कशी झाली हे अनेकांना माहीत नाही. एकोणीसशे अठ्ठेचाळीस साल. महात्मा गांधींची हत्या झाली त्यानंतर, त्यांच्या अस्थी विसर्जनाचे चित्रिकरण, रुस्तम-मास्टर, हरकिशन कपाडिया, कृष्ण गोपाळ आणि बिनॉय रॉय हे छायाचित्र-कार करीत होते. तो दिवस होता बारा फेब्रुवारी १९४८. फिल्म्स डिव्हिजनचे हे पहिले चित्रिकरण. त्यानंतर 'काश्मीर कॉल्स ऑन' हा पहिला अनुबोधपट श्री. भास्करराव यांनी तो दिग्दर्शित केला होता.

दोन तीन महिन्यातच श्री. मोहन भवनानी यांनी फिल्म्स डिव्हिजनची सूत्रे हातात घेतली. १९४९-५० या दरम्यान ३२ काळे-पांढरे आणि एक रंगीत अनुबोधपट आणि ५२ वार्तापट निर्माण केले. १२ अनुबोधपटांचे कम्पायलेशन्स पण याच वेळी झाले. प्रत्येक आठवड्याला एक वार्तापट आणि एक अनुबोधपट सिनेमा-गृहातून दाखवायला याच वेळी सुरुवात झाली. आता या घटकेला, निर्मितीच्या विसाव्या वर्षी, फिल्म्स डिव्हिजनची क्षमता वर्षाला १७० वार्तापट-अनुबोधपट अशी आहे. गेल्या वीस वर्षात फिल्म्स डिव्हिजनने २,७०० अनुबोधपट-वार्तापट बनवले. त्यापैकी अनेक अनुबोधपटाना परदेशी चित्रपट महोत्सवात बक्षिसे मिळाली आहेत. विसाव्या वर्षाचे अभिनन्दन करताना, डॉक्युमेन्टरी फिल्मसचे एक जनक डॉ. जॉं ग्रिअरसन् यांनी आपल्या पत्रात म्हटले आहे : "कालचा तुम्ही बिलकुल विचार करू नका. चांगला अनुबोधपट तुम्ही उद्या निर्माण करणार आहात." (Do not think too much of yesterday. The only good film is the one you are going to make tomorrow.)

फिल्म्स डिव्हिजनवर कितीसे आरोप केले गेले; अनुबोधपटांवर-वार्तापटांवर कितीही टीका केली गेली. तरी, फिल्म्स डिव्हिजनने जनमानसात अनुबोधपटांची एक प्रकारची गोडी निर्माण केली आहे ती गोष्ट विसरता येणे शक्य नाही. बोलपट-गृहात अनुबोधपट चालू झाला की लोक बाहेर जातात हे असे, अनुबोधपटांच्या टीकाकारांकडून सांगितले जाते. पण ते खोटे आहे हे अनेक वेळा सिद्ध झाले आहे. सध्याचा चित्रपट प्रेक्षक माहितीपट पहायला विशेष उत्सुक असतो. काही वेळा तो मुद्दाम माहितीपट पहायलाच सिनेमाला जातो. पाहिलेल्या माहितीपटाबद्दल बरी-वाईट चर्चा तो आपल्या मित्रमंडळीत करतो हे माहितीपटांचा दर्जा सुधारल्याचे लक्षण असेल किंवा या प्रेक्षकांना माहिती-पटाचे महत्त्व लक्षात आले असेल.

आश्चर्याची गोष्ट आहे. माहितीपट दाखविण्याची आमच्यावर जबरदस्ती (माहितीपट न दाखवल्यास परवाना रद्द करण्यात येतो.) करण्यात येते, अशी ओरड करणाऱ्या वितरकांकडूनच, फिल्म्स डिव्हिजनकडे माहितीपटांसाठी मागणी येते. कित्येक वेळा, या अनुबोधपटामुळेच मुख्य चित्रपटाच्या उत्पन्नाचे आकडे फुगतात. कारण, प्रेक्षक माहितीपट पाहण्यासाठी रीघ लावतात. उदा. 'राणी एलिझाबेथची भारत भेट', 'नेहरूंचा मृत्यु', 'भारत-पाक संघर्ष', शास्त्रीजींचा मृत्यू, क्रिकेट टेस्ट-मॅचेस, नेहरूंच्या मृत्यूनंतर दिल्ली येथील फिल्म्स डिव्हिजनच्या ऑडिटोरीअममध्ये, प्रत्येक दिवशी ११ खेळ होत होते. आणि प्रत्येक खेळ 'हाऊसफुल्ल' होता. अशा काही वेळा, माहितीपट प्रत्येक सिनेमा-गृहातून दाखवला जात नाही, म्हणून प्रेक्षक आणि वितरकांकडून कम्पलेन्टस् केल्या जातात.

जगातील जास्तीत जास्त माहितीपट निर्माण करणाऱ्या संस्थेपैकी फिल्म्स डिव्हिजन एक आहे. असं असूनही अनुबोधपटांच्या बाबतीत देशाची एक शतांशहून कमी गरजसुद्धा पुरवू शकत नाही. पण त्याचबरोबर आहे त्या अनुबोधपटांचे योग्य वितरण होत नाही. त्या दृष्टीने फिल्म्स डिव्हिजनचे सध्याचे कंट्रोलर श्री. के. एल. खांडपूर यांनी इंडियन इन्स्टीट्यूट ऑफ मास कम्युनिकेशनच्या सेमिनारमध्ये वाचलेल्या पेपरमध्ये पुढील माहिती दिली आहे : "या घटकेला अनुबोधपटांचे वितरण करणारी फिल्म्स डिव्हिजन ही एकच संस्था आहे आणि ही संस्था आपण निर्माण केलेल्या अनुबोधपटांचे सुमारे ३०,००० ते ४०,००० प्रिन्टस थियेट्रीकल आणि नॉन थियेट्रीकल वितरणासाठी देते, पण त्याचा हवा तसा उपयोग केला जात नाही. या प्रिन्टस्चे योग्य प्रकारे शो अरेंज केले तर दररोज २५,००० शो करता येतील; पण सध्या काही शेकडाच शो केले जातात. दर आठवड्याला पंचवीस लक्ष लोक फिल्म्स डिव्हिजनचे माहितीपट पाहतात. पण ज्या प्रेक्षकांसाठी मुख्यत्वे हे माहितीपट बनवले जातात अशा नागरिकांपर्यंत योग्य वितरण व्यवस्था नसल्याने हे माहितीपट पोचतच नाहीत

फिल्म्स डिव्हिजन ही सरकारी संस्था असल्याने, अनेक वेळा योग्य निर्णय घेण्यास साहजिकच वेळ लागतो. कालव्यय होतो.

फिल्म्स डिव्हिजन सध्या इंग्लीश, हिंदी आणि इतर बारा भाषांतून माहितीपट निर्माण करते. ही संख्या इतर देशांच्या मानाने खूपच आहे. पण या चौदा भाषांव्यतिरिक्त इतर अनेक भाषांतून हे माहिती-पट निर्माण करावेत म्हणून सारखी वाढती मागणी आहेच. दिवसेंदिवस माहिती-पटाची मागणी वाढतच आहे. आणि ती सारखी वाढतच जाणार आहे. टेलिव्हिजनचा प्रसार जसजसा या देशात वाढत जाईल तसतशी माहितीपटांची मागणी सारखी वाढतच जाईल. भारतात वर्षाला सुमारे तीनशे माहितीपट बनवले जातात. पण भारतापेक्षा क्षेत्रफळाने आणि लोकसंख्येने लहान असलेल्या जपानमध्ये वर्षाला ३,००० माहितीपट बनवले जातात. शैक्षणिक आणि जनसंपर्काच्या दृष्टीने माहितीपटांना फार महत्त्व आहे. पण त्यांचा हवा तसा उपयोग करून घेण्याची आवश्यकता आहे.








गेल्या वीस वर्षांत फिल्म्स डिव्हिजनने निरनिराळ्या विषयांवरील सुमारे २,७०० माहितीपट बनवले. श्री. भवनानी किंवा इझ्रा मीर यांच्या कारकीर्दीत, फिल्म्स डिव्हिजन माहितीपट निर्माण करीत होते; पण त्यात जोश नव्हता. पण श्री. के. एल. खांडपूर मुख्य निर्माता झाले आणि श्री. भावनागरी, फिल्म्स् अॅडव्हायसर म्हणून आल्यानंतर अनुबोधपटांचा दर्जा खूपच सुधारला. नव्या नव्या कलाकारांना वाव मिळाला. १९६८-६९ सालात फिल्म्स डिव्हिजनने देशांत आणि परदेशात सर्वात जास्त अॅवार्ड मिळवले. श्री. एस. एन. एस. शास्त्री यांच्या 'माझे वय वीस' सुखदेवचा 'भारत ६७', एम. एफ. हुसेन 'चित्रकाराच्या नजरेतून' स्वतः भावनागरींचा 'अकबर' दिलीप जामदार यांचा 'कॉसकरंट', वी. खोसलांचा 'देन दी रेन' किंवा प्रमोद पति यांचा 'एक्स्प्लोरर' या एकापेक्षा एक अशा सरस अनुबोधपटांनी जागतिक कीर्ती संपादन केली. गेल्या दोन वर्षांतील फिल्म्स डिव्हिजनची अनुबोधपट निर्मिती डोळयात भरण्यासारखी अशीच आहे.

अनुबोधपटांच्या मानाने फिल्म्स डिव्हिजनचे वार्तापट तितकेसे विशेष लोकप्रिय होऊ शकत नाहीत त्याला एक महत्त्वाचे कारण म्हणजे ते सात दिवसांनी प्रकाशित होतात. दरम्यान रेडिओ आणि वर्तमान पत्रे यांच्या द्वारा बातम्या लवकर पोचतात. तसेच न्यूज प्रेझेंटेशनच्या बाबतीत, वार्तापट खूप गचाळ असल्याचा प्रेक्षक टीका करतात. तसेच वार्तापटांचे वितरणही ज्या प्रमाणात व्हायला पाहिजे तसे होत नाही राष्ट्रपती झाकीर हुसेन यांच्या मृत्यूला आता दहा महिने होत आले; पण त्यांच्या मृत्यूचे दर्शन दाखवणारा वार्तापट काही ठिकाणी आत्ता कुठे दाखवण्यात येत आहे.

जसजसा टेलिव्हिजनचा प्रसार होत राहील तसतसे फिल्म्स डिव्हिजनच्या वार्तापटांचे महत्त्व कमी होत जाईल. कारण टेलिव्हिजनवर वर्तमानपत्रापेक्षाही लवकर माहिती दृष्यरूपात दाखवता येईल. पण या वेळी फिल्म्स डिव्हिजनचे तंत्रज्ञ कमी पडतील असे नाही. कारण जेव्हा जेव्हा आवश्यकता भासली तेव्हा तेव्हा फिल्म्स डिव्हिजनने टेलिव्हिजनच्या गतीने वार्तापट प्रसारीत केले. उदाहरण द्यायचेच झाले तर, स्व. जवाहरलाल नेहरू, स्व. लालबहाद्दुर शास्त्री, स्व. झाकीर हुसेन यांचे मृत्यु किंवा भारत पाकिस्तान संघर्ष.

इतके दिवस फिल्म्स डिव्हिजनच्या वार्तापटात प्रादेशिक बातम्यांना महत्त्व दिले जात नसे. आता या प्रादेशिक बातम्या जास्त प्रमाणात चित्रिकरण करायची व्यवस्था करण्यात आली आहे.

एकूण गेल्या वीस वर्षांत फिल्म्स डिव्हिजनने, माहितीपट, अनुबोधपट आणि वार्तापट यांच्या निर्मितीत केलेली प्रगती खास नजरेत भरण्यासारखी आहे.

• • •

# पा न पु री

## प्रश्न कळला, प्रॉब्लेम नाही !

एक इंग्लिश, एक अमेरिकन व एक फ्रेंच अशा तीन तरुणींना एक प्रश्न विचारण्यात आला, "समजा पॅसिफिक महासागरातील एका बेटावर तुम्ही एकटीच्या दहा खलाशांच्या तावडीत सापडलात, तर काय कराल ?"

आंग्ल युवतीने उत्तर दिले, "मला बाई फीट येईल." अमेरिकन म्हणाली, "मी त्या खलाशांच्या तांडेलाकडून संरक्षण घेईन." आणि फ्रेंच तरुणी उत्तरली, "प्रश्न तर कळला, पण त्यातला प्रॉब्लेम समजला नाही."

## तुमच्या जवळ जे जास्त आहे !

बायकोला काहीतरी खरेदी करायची होती, म्हणून तिने आपल्या पतीजवळ दहा रुपयांची मागणी केली.

"पैसे, पैसे, पैसे", नवरा ओरडला, "दररोज तुला अधिकाधिक पैसे पाहिजे. मला विचारलं तर मी म्हणेन की, तुला पैशापेक्षा 'डोक्या'चीच अधिक गरज आहे."

"खरं असेल ते", बायको म्हणाली, "परंतु तुमच्याकडे जे जास्त आहे, तेच मी मागते आहे."

## दर्शन घ्यावं म्हणून

एका इन्कमटॅक्सच्या कचेरीत एक सद्गृहस्थ आले आणि त्यांनी तेथील हेडक्लार्कजवळ साहेबांशी भेटण्याची आपली इच्छा व्यक्त केली.

लवकरच साहेबांकडून त्यांना बोलावणे आले. साहेबांनी म्हटले, "बोला, आपली काय सेवा करू ?"

"नाही, मी सहज आलो होतो," तो गृहस्थ म्हणाला, "म्हटलं ज्यांच्या ज्यांच्या करिता आपण पैसे मिळवतो, त्या सर्वांचं एकदा दर्शन तर घ्यावं !"

## संपादकीय उत्तर

एकदा एक देशभक्त एका दैनिकाच्या संपादकाकडे गेले आणि त्यांनी तावातावाने विचारले, "मी खोटं बोलणारा नि बदमाश आहे, असं तुम्ही छापलंत ना ?"

"मुळीच नाही.", संपादक शांतपणे उत्तरले, "शिळ्या बातम्या आम्ही छापीत नसतो."

## अंतिम इच्छा

गुन्हेगाराला विजेच्या खुर्चीवर बसवून ठार मारण्याची शिक्षा झाली होती. खुर्चीवर बसवल्यावर तुरुंगाधिकाऱ्यांनी त्याला विचारले, "तुमची काही शेवटची इच्छा आहे का ?"

"हो, माझा हात धरून ठेवा., मला भीती वाटते.", गुन्हेगार म्हणाला.

–श. शी. पेंढारकर







अनुक्रमणिका

**....कॅशरच्या नोकरीचं मला मोठं आकर्षण होतं....कसंही करून कॅशर व्हावं यासाठी मी धडपडत होतो...माझी धडपड यशस्वी झालीही ...पण...पण...**

नीलकंठ देशमुख




सर्वांच्या पोटाची सोय लावणाऱ्या या मुंबईत मीही पोट भरण्यासाठी दाखल झालो. ट्रंक आणि वळकटी व वळकटीवर आडवी छत्री ठेवून मी बोरीबंदरच्या बाहेर पडलो. आणि मला आश्चर्याचा जबरदस्त धक्का बसला.

म्हशावा ठोंबे, बी. ए. अशी पाटी एका लाकडी खोक्यावर लावून एक तरुण 'बूट-पॉलिश करायचे का ?' म्हणून प्रत्येकास विचारीत होता. तीन पंचवार्षिक योजनांचे जर हे फळ तर चौथी योजना गर्भावस्थेत असताना नोकरीसाठी धडपडणाऱ्या माझी वाट काय लागणार हे स्पष्ट झाले आणि मी निराश झालो.

आल्यासरशी काही प्रयत्न करावा, न जमल्यास परत गावची वाट धरावी असे मी ठरविले. आठ पंधरा दिवस तशी पोटा-पाण्याची ददात नव्हती. चिचपोकळीला मेव्हणा (सख्खा) होता. त्याच्याकडे जेव-णार होतो. ज्याला मी बहीण दिली तो काय मला आठ-पंधरा दिवस जेवण देणार नाही ?

आणि पहिल्या दिवशी संपूर्ण विसावा घेऊन मी दुसरे दिवशी सकाळीच नोकरी-साठी बाहेर पडलो.

मला पदवी नसली तरी मी अगदीच अडाणी नव्हतो. एक हौद एका तोटीने चार तासात भरतो तर तो पाच तोटयांनी किती वेळात भरेल हे मी सांगू शकत होतो. आकृ-तीच्या सर्व बाजूंच्या बेरजेस परिमिती म्हणतात ते मला पाठ होते—आणि पक्षाच्या उमेदवारास पाडले म्हणजे पक्ष जास्त बळकट होतो इतपत राजकीय ज्ञानही मला होते. या भांडवलावर एक टिचभर खळगी भरता येईल असा मला विश्वास होता.

मला फोर्टमध्ये जायचे होते. मी एका पोलीसाला नम्रपणे रस्ता विचारला, पण त्यावेळी तो एका माणसाशी काही महत्त्वाचे बोलून एकीकडे खिशात नोटा कोंबीत होता. त्याच्या ड्यूटीमध्ये माझा व्यत्यय आल्याने तो भलताच भडकला. मला त्याने मस्तपैकी मुचांडी दिली. "गुमानं म्होरं जा, नायतर रस्त्याऐवजी जेलची हवा दावतो." हे त्याचे शब्द ऐकायला मी तेथे थांबलो नाही.






"काय जिवा, हंकड कुठं ? " माझा एक गाववाला खांद्यावर हात ठेवून (माझ्या) मला विचारीत होता. त्याला पाहून मला फार आनंद झाला. त्यालाही तसाच आनंद झाला असावा. त्याने मला हॉटेलात नेलं व एक कप चाय आम्ही दोघं प्यालो.

मी नोकरीसाठी मुंबईस आल्याचे कळ-ताच तो भलताच भडकला.

"आरऽऽ आपल्यासाठी यवढी ह्याड्. पी. खोललीय तिथं घुसायचं सोडून ममईत हाय काय? चांगलं विलक्षणला उभं ऱ्हायचं, जितलो की अध्यक्ष, हरलो की चपराशी. पन तिथंच ! ह्याड. पी. सोडायचा नाय! " त्यानं आपला सल्ला दिला.



"हे बघा समद्यांनाच काय ते झेपनार नाय. मला आपली इथंच नोकरी पघा." मी सांगितले.

"आन शेती कोन करनार तुझी ?"

"हाय एक येडसर भाऊ. त्यो पघल." मी.

"पन तुला इथं लगेच नोकरी कोन देनार ?"

लगेच नाय पन चार आठ दिसात मिल्ली तरी चालल."– मी माझ्या बेकारीची कुवत दाखविली.

"पन कुठं करायचीय तुला नोकरी?"

"ममईत पन ह्याड्. पी. आसलच की. तिथं द्या चिकटवून क्याशर म्हनून"– मी मी माझी अपेक्षा व्यक्त केली.

"काय येडा हायिस काय ? ममईत ह्याड्. पी. नसतं."

"वरं, मग कुठंवी क्याशर म्हून ऱ्हाईन."

"त्यावढं सिक्सान कुठंय तुझं ? "

"पैसं नीट मोजता येत्यात की समद आणखी काय हवं ?" मी विचारले.

"जिवा, खरं सांगू का ममईत पडल त्ये काम करायची तयारी ठिवली तरच दोन टायमाला पोटाला घावतं. हमाली करायची पन तयारी हवी गड्या."

" त्य खरं हाय. पन मुख्य मंत्री व्हायची तयारी करावी तवा उपमंत्रीपद मिळतं तसंच 'क्याशर' व्हायची तयारी करून मी शेवटी हमाली पन कराया तयार हाय. पन प्रयत्न जरा मोठाच हवा. काय, खरं का नाय ?" – मी.

"वा, वा ! गांवच्या साळत जाऊनही तू यवढा शाना बनला, आश्चर्यच की! "

"मग बघनार का माझ्यासाठी नोकरी ? समजा क्याशर म्हून नाय, निदान ही बस-गाडी जातेय तिच्यात कंडक्टार म्हूंन. . . . "

"पब्लिकशी भांडान आन् मारामारी करायची तुझी तयारी हाय ? तरच त्ये काम तुला जमल."

"नाय, बा, यवढी ताकत नाय आपल्या-जवळ."

"तर मग त्यो नाद सोडून दे. दुसरा काय तरी विचार कर."

"भायखळ्याच्या किंवा फुले मार्किटात फळं भाजीपाला विकायला आपन तयार हाय." मी दुसरा तोडगा सुचविला.

"त्या ठिकाणची कचऱ्याची घान सहन करणाऱ्यांनीच तिथं जावं. तुला गांवच्या मोकळ्या हवेची सवय. तुला तिथं घडीभर पन उभं राहातां नाय यायाचं !

"तर मंग "

वास झालं तर मंग, त्यो पघ मोर्चा चाललाय, तुला मोर्चेवाला म्हून काम हवंय ?"

"म्हंजी, ही कसची नोकरी ?" मी विचारले.

"आर्ऽऽ ज़िवा यवढा शाना म्हनव-तोस, राजकारन बोलतुस आन् तुला मोर्चा ठावं नाय ?"

"मोर्चा म्हंजी प्रभात फ्यारी तर नव्हं ?"

"आर ऽ ऽ देश स्वतंत्र झाला आन् प्रभात फेऱ्या संपल्या. आता देशाच्या काळजीनं पुढाऱ्यांना झोप येत नाय. सकाळी उठायला उशीर होतो. मग परभात फ्यारी काढणार कोन ?"

"खरंच की ! आमच्या धड्यात व्हती फेरीची माहिती."

"अगदी पुढाऱ्याच्याच भासत सांगा-यचं म्हंजी परभात फ्यारी अगदी इतिहास-जमा झाली." गांववाला म्हणाला.

"मग तो मोर्चा कसला ?"

"आर, आझाद मैदानावर दुपारी कवा-तरी जमायचं. हातात एक लाल बावटा घ्यायचा आन् मिरवनुकीनं सचिवालयावर नायतर विधानसभेवर जायचं ! जाताना मोठमोठ्यानं वरडायचं. . . . झिंदाबाद . . . मुर्दाबाद. . . . .हम सब एक है. . . . . .जगा-तल्या कामगारांनो एक व्हा .वरना खुर्ची छोड दो "

"म्हंजी काय ? " मी विचारले.

"मला तरी काय ठावं ? वरडायचं म्हंजी वरडायचं. लांब जायचा कटाळा आला की महापालिकेसमोरच वरडायचं. त्याला म्हनत्यात निदर्शन. पन् बोंब एकच. . . .

"आमच्या मागन्या मान्य करा. पगार-वाढ झालीच पायजे, म्हागाई वाढलीच पायजे."

"आरं पन् आपल्याला कुठाय पगार

आन् म्हागाई तर ती वाढायची ?" मी विचारले.

"यडा• का काय तू ? उगाच मम‍ईला आलास. आर ऽ ऽ असा मोर्चा निदर्शनात वरडलास की तीन रुपयं मिळत्यात. दिवसाचं जेवन चायपानी सुटतं."

"पन ह्ये किती दिवस ?" मी विचारले.

"चांगली चाकरी मिळेल तोवर. यकदा पोटापान्याची नीट सोय झाली का मंग निदर्शन नाय."

"चालल, चालल."

आणि मी एका मोर्चात त्याच्याबरोबर घुसलो. दोन तीन तास मिरवणूक, सभा झाली, आम्हाला घरी जायला सांगितलं. माझा गाववाला जरा जाऊन येतो म्हनाला. मी एका झाडाखाली उभा राहिलो.

तो जरा वेळाने आला आणि त्याने माझ्या हातावर अडीच रुपये ठेवले.

"काय रं ? तीन रुपये म्हणालास ना ! "

"आर् त्या कंत्राटदारानं कमिशन घ्येतलं. पन. मला वी त्येवढच मिळालं."

आणि एक आठवडा मी निदर्शकाचं काम केलं.

निदर्शन चालू असता इतर कामगारांबरोबर हॉटेलांत जाऊन दुसऱ्याच्या पैशाने चहा कसा प्यायचा ते पण मी शिकलो.

पण त्या आरडाओरडीत मन लागेना. परत मी नोकरी शोधू लागलो.

दुसऱ्या दिवसापासून मी क्याशरची नोकरी मिळविण्याच्या प्रयत्नास लागलो. मला त्याच नोकरीचे फार मोठे आकर्षण वाटत होते. कारण अनेक क्याशर बंगलेवाले बनल्याचे मला माहित होते.

मी प्रथम एका बँकेत गेलो, तेथे दारावर असलेल्या गुरख्यास "मला कॅशरची नोकरी मिळेल का ?" असा प्रश्न केला, पण त्याने कोणतेही धड उत्तर न देता माझ्यावर एकदम बंदुकच उगारली. मी शहाणपणाचा मार्ग म्हणून काही एक न बोलता तेथून निसटलो.

थोडया वेळाने मला एक कापडाचे दुकान दिसले. तेथे एकजण गल्ला परत परत मोजीत होता. याचा अर्थ त्याला कॅशरचे काम नीट येत नव्हते. मी तेथे गेलो. "मला पैशाची मोजदाद चांगली येते, मला कॅशर म्हणून .

आणि पुढचे शब्दही त्याने ऐकून घेतले नाहीत. जवळच असलेला एक गज त्याने माझ्यावर उगारला.

"शाला, शरम नाय वाटते, आनचे पोटवर पाय आणते, ज्या, ज्या, ज्याड्. पी. मंदी ज्या. इथं कमाला येते मरायला" हे त्याचे शब्द मी एक फर्लांगावर ऐकले.

पुढे मला एक 'भवानी माता विश्रांति गृह' दिसले. हॉटेल गचाळ होते व गिऱ्हाईक नसल्याने गल्ल्यावरचा माणूस विश्रांती घेत होता. आपण गल्ल्यावर बसून त्याला नीट घरी विश्रांतीसाठी पाठवावे असा मी विचार करून पुढे झालो. मी 'काही विचारण्याच्या आतच तो माझ्यावर खेकसला.

"साकऱ्या महाग झालाया. शिगल जायला २० पैसे पडत्याल. आन उधारी बंद हाय."

त्याचा एकूण आवेश पाहूनच मी जास्त काही न बोलता तेथून निघालो.



"सोकावलेत भोसडीचे फुकाट चाय प्यायला" हे त्याचे शब्द मी मनाला लावून घेतले नाहीत.

आणि क्याशर होण्याचा विचार मी सोडून दिला. दैवाने मला कॅशर होऊ दिले नाही. इतकेच नव्हे तर इतर कोण-तीही नोकरी मिळू न देण्याचे त्याने ठर-विले की काय कोण जाणे. मेव्हण्याने महिनाभर पोसले आणि नंतर परतीच्या भाडयाचे पैसे देऊन घराबाहेर काढले.

मला तर गावी जायचे नव्हते. अनेक दोस्तांशी 'मी मंमईत क्याशर होनार' अशी पैज मारून आलो होतो आणि आता तसेच बेकार जायचे हे मनाला पटेना. माझे दोस्त रोज पेपर वाचीत असतील. 'क्याशर जळाला' अशी एखादी वातमी वाचायला ते आतुर होते, पण त्यांच्या नशीबात तसा योग नव्हता.

दिवसामागून दिवस जात होते. (आणि रात्री पण जात होत्या) कडीपार गांवचा जिवा बेकारच होता. कुठे हमालीचे पण काम मिळेना, उपासमार होऊ लागली. गावचा तो माणूस परत कधीच भेटला नाही. काय करावे ते सुचेना.

मी विचार करीत रस्त्याच्या कडेला उभा होतो. तीन दिवस पोटात अन्नाचा कण नव्हता. तेवढयात एक माणूस माझ्या जवळ आला.

"मी पांच मिनिटात जरा जाऊन येतो, तोवर ही पिशवी सांभाळ." असे सांगून त्याने पिशवी व पाच रुपये माझ्या हातात कोंबले व तो दिसेनासा झाला.त्याच्या कपडयावर रक्ताचे डाग होते हे नंतर माझ्या लक्षात आले.

आणि बरोबर पाच मिनिटांनी पोलीस आले. त्यांनी माझ्या हातातील पिशवी पाहून मला अटक केली. मी त्यांना खरा प्रकार सांगण्याचा खूप प्रयत्न केला. पण "आता काय सांगायचं ते पोलीस ठाण्यावर सायबास्नी सांगा" या पलीकडे ते काही बोलायलाच तयार होईनात.

आणि मी एका खुनाच्या कटात गोवलो गेलो. एका चाळीत एका बाईवरून भांडण झाले. त्यांत बाईच्या नवऱ्याचा खून झाला व खुनी इसमास मी मदत केली. मला पिशवी देणारा इसम पण त्यांनी पकडून आणला. आम्हांस एकाच कोठडीत ठेवण्यात आले. मी त्याच्यावर भलताच भडकलो. त्याचा खून करण्याची पण मी धमकी दिली, पण तो शांत होता.

"हे बघ दोस्ता, मी एकटयाने खून केला असं ठरलं तर मला फाशीच जावं लागेल पण कट होता असं दिसलं तर जन्मठेपेवर निभतं. म्हणून तुला जोडीला घेतलं." तो हसत हसत म्हणाला. आणि त्याने माझ्या कानात एक वाक्य हळूच सांगितले. त्याचा मला त्यावेळी काहीच अर्थ समजला नाही.

त्याच्या भाकिताप्रमाणे त्याला १० वर्षे व मला ५ वर्षे सक्तमजुरीची शिक्षा मिळाली. आम्ही दोघे येरवडा जेलमध्ये दाखल झालो. आणि माझ्या मित्राने कोठ-डीत कानात जे वाक्य सांगितले त्याचा मला प्रत्यय येऊ लागला.

मला अटक होण्यापूर्वी तीन दिवस मी उपाशी होतो. त्यापूर्वी महिनाभर अधून-मधून उपास घडतच होते; पण अटक होताच माझी उपासमार थांबली, फुटपाथपेक्षा जास्त चांगला निवारा मला मिळाला. दिवसभर भरपूर काम करावे व हक्काचा भाकरतुकडा खावा, असा क्रम सुरू झाला. गरजेपुरते कपडे पण मिळू लागले. बेकार असताना 'उद्या काय' या प्रश्नाने झोप येत नसे. आता उद्याचा प्रश्न पांच वर्षे-पर्यंत भेडसवणार नव्हता. त्यामुळे शांत झोप येऊ लागली.

माझा कामसूपणा, आज्ञाधारकपणा यामुळे जेलर माझ्यावर खूष होता. एक वर्ष असे गेल्यानंतर जेलरने मला बोलाविले.

"जिवा, तुझ्या वर्तनावर मी खूष आहे. तू खूनी असूनही इतका चांगला वागतोस याचे मला आश्चर्य वाटते. मी आता तुला हलके काम देणार आहे. जेलचा क्याशर ५ हजार रुपये घेऊन पळालाय. आता मी तुलाच कॅशर म्हणून काम देणार आहे. करशील ना ?"

जेलरला मी काय उत्तर देणार ? माझा आनंद गगनात मावेना (जेलमधून दिस-णाऱ्या गगनात) मी अखेर क्याशर झालो.

आणि दुसरेच दिवशी गावी माझ्या दोस्तांना पत्र पाठविले. त्याचा मजकूर असा —

..........यांस जिवाचा रामराम.

गेल्या वर्ष दीड वर्ष पत्र पाठविले नाही याचा राग नसावा. कॅशरची नोकरी मिळाल्याशिवाय पत्र पाठवायचे नाही असे ठरविले होते. मुंबईत बऱ्याच नोकऱ्या केल्यानंतर ही नोकरी मिळाली व लगेच येरवडयास बदली झाली. पगार फार नाही, पण जेवण खाण व कपडा सुटतो. तुम्हांस भेटावयास यावं असं फार वाटतं पण नोकरी जबाबदारीची. मालकाने पांच वर्षांचा बाँड लिहून घेतलाय त्यामुळे जागचे हालता येत नाही. सुटका होताच गावी येईन.

पण हे लिहित असतानाच मला १० वर्षांची शिक्षा झाली नाही याचे मला मनातून वाईट वाटत होते.

● ● ●










स्टकोम (हा उच्चार आपल्या स्टॉकहोम भूगोलाला अपरिचितच) आले असा स्मार्ट साद ऐकू आला. पट्टे आवळण्याच्या आतच चाके जमिनीला लागली व आमचे पायही! माझ्या हातावरील घड्याळ सव्वा नऊ – फिनलँड वेळ दाखवीत होते, पण स्टॅकोमची घड्याळे म्हणत होती, 'छे आता कुठे सव्वाआठ वाजलेत.' कारण आम्ही पश्चिमेस आलो होतो. चला जीवनाच्या जमाखर्चात एका तासाची जमेकडे भर पडली व त्याच तासातून त्याच दिवशी पुन्हा जाण्याचा आनंद लाभला. या अनुभवावरून पश्चिमेकडे आयुष्यमान कां वाढते या कोडयाचा एका अर्थाने उलगडा झाला.

स्टकोमचे आरलांदा विमान स्टेशन फार झक्क आहे. उन्हही चक्क पडले होते. सध्या युरोपात ग्रीष्म होता. प्रसन्न सूर्यप्रकाश आम्हांला न्हाणीत होता. आरलांदा विमानतळावर एक रंगभरी गंमत दिसली. हॉलमध्ये येण्याला दोन मार्ग आहेत. एकावर लाल पायघड्या तर दुसऱ्यावर हिरव्या. तुमच्याजवळ कस्टमला घोषित करण्यासारखी काही करपात्र चीज असली तर लालमार्गाने जा, पण तसे जर काही नसले तर बिनदिक्कत हिरवा मार्ग चोखाळा. मला वाटले ही नैतिक हरित-क्रांती भारतात कधी काळी होईल का! आम्ही फक्त सकाळ-संध्याकाळ 'सत्यमेव जयते' घोकतो पण व्यवहारात हे वचन सोयीस्करपणे विसरतो!

विमानतळापासून विमान वेस खूप दूर पंचवीस मैल आहे. स्वीडनच्या प्रथम दृष्टिक्षेपातच त्या देशाची निसर्गरम्य ओळख पटली. प्रवासाला काचेरी आराम बस मिळाली होती आणि भाडे फक्त आठ स्वीस क्रोनोर. क्रोनोर म्हणजे क्राऊन. एक क्रोनोर म्हणजे भारताचे ७५ पैसे. एका क्रोनोरचे १०० ओरे म्हणजे पैसे मिळतात. कॉंटिनेंटवर दशमान नाणे पद्धतीच प्रचारात आहे. मोजण्याला सोपे. याला अपवाद म्हणजे इंग्लंड.

हेलसिंकीलाच स्टकोम, ऑस्लो व कोपनहेगनच्या हॉटेलांचे आरक्षण केले म्हणून सोयीचे झाले. सरळ स्टॉकहोम हॉटेलमध्ये गेलो. सहाव्या मजल्यावर हवाई खोली मिळाली होती. या हॉटेलचे वैशिष्ट म्हणजे इतरांप्रमाणे याचे कार्यालय तळमजल्यावर नसून चवथ्या मजल्यावर आहे. खोलीभाडे दिवसाला १०० रुपये होते. त्यात फक्त प्रातराशाचा समावेश होता. ब्रेड, चीज, बिस्कीटे, दूध मिळाले. हॉटेल खोलीत 'मला त्रास देऊ नका' असा कुलुपाच्या आकाराचा सुबक बोर्ड होता. तुम्हांस जर स्वस्थ आराम करायचा असेल तर हा बोर्ड खोलीबाहेर टांगणे. मग तुम्हाला सकाळी कुणी उठविणार नाही. अगदी 'गुडमॉर्निंग, न्याहारीला काय हवे' हे विचारण्याची सबब वेटरलासुद्धा मिळू नये म्हणून खोलीत-परहोष्टला-न्याहारीला मिळू शकणाऱ्या खाद्यपेयांचा तक्ता टांगलेला होता. आपल्याला हव्या असलेल्या चीजांवर खुणा करून खोलीबाहेर तो तक्ता लावला की छोटी हजेरी सकाळी हजर. उतारूंच्या मिजाशीची केवढी ही संदेवाईक जपणूक!

न्याहारी, आटोपली व नगरदर्शनाची काय सोय आहे हे पहाण्यासाठी कार्यालयात गेलो. तेथे मॅनेजरने स्टॉकहोमचा उपयुक्त नकाशा व बसचे माहितीपत्रक मला दिले. त्यातून दीड वाजता निघणाऱ्या 'ब' पर्यटनाच्या ग्रेट सिटी साईट सीईंग बसचे सोळा रुपयाचे तिकीट घेतले. युरोपमध्ये हॉटेलातच नगरदर्शन बसची तिकिटे मिळतात. पॅरीस, ब्रुसेल्स, व्हिएन्ना येथे तर बस आमच्या हॉटेलच्या दाराशीच आली व शहरपर्यटनानंतर पुन्हा हॉटेलशीच परत सोडले. मात्र स्टॉकहोममध्ये गुस्ताव ॲडोल्फ तोर्गवरील रॉयल ऑपेरा गृहासमोरील दीडची आरामगाडी तेथे जाऊन पकडावी लागली. स्टॉकहोममध्ये जिकडे तिकडे तोर्ग आहेत. तोर्ग म्हणजे मार्ग.

बसमधील धावत्या समालोचकाने उत्तम इंग्रजी माहिती पुरविणे सुरू केले.

## तलाव आणि जंगलांचा देश

स्वीडन हा उत्तर युरोपातील देश फार पुरातन आहे. पण आज तो अत्यंत आधुनिक विकसित देश समजला जातो. स्वीडनमध्ये ९६,००० तळी-तलाव आहेत. कॅनडाप्रमाणे प्रचंड जंगल-वने आहेत. प्राचीन व अद्ययावत् यांचा सुरेख संगम म्हणजे स्वीडन. स्टॉकहोम या अद्ययावत राजधानीच्या मध्यवर्ती ठिकाणी गामलास्तान ही पुराणी नगरी आहे. मध्ययुगीन वास्तुकलेची घरे या भागात अजूनही आहेत. यातील मुख्य रस्त्यावर मोटारीस बंदी असल्याने आम्ही पायीच हिंडलो. काही रस्ते छोटया छोट्या वर डोके काढणाऱ्या चौकोनी दगडांचे – भारतातील काशी, पंढरपूर वगैरे तीर्थक्षेत्रातील जुन्या रस्त्यासारखे आहेत. गामलास्तानच्या अवतीभोवती मात्र आधुनिक स्टॉकहोम वीसबेटांच्या समूहावर केवड्याच्या बनासारखे अफाट फुलले आहे. 'सप्तद्वीपा वसुंधरा' असे प्राचीन आर्यावर्तात म्हणत असत. मुंबापुरी ही मुळात सप्तद्वीपातच होती. ही सागर द्वीपे आहेत. बाल्टीक समुद्रातील मालारे आणि सॉल्टान या सुंदर जोड-सरोवरातील बेटांच्या पुंजक्यावर वसलेले स्टॉकहोम म्हणजे कमळांचे ताटवेच होत. ही द्वीपलक्ष्मी स्वतःच डोळ्यांनी पाहिली पाहिजे.

स्टॉकहोम तेराव्या शतकात वसविले गेले. याचा छोटा शेजारी डेन्मार्क याच्या बरोबर हे एक संयुक्त राज्य होते. पण गुस्ताव वासा या थोर राजाने सोळाव्या शतकात या संयुक्त राज्याच्या जोखडातून स्वीडनला मुक्त केले. त्यामुळेच या थोर राष्ट्रनेत्याला स्वीडनचा वॉशिंग्टन म्हणून आजही गौरवितात. स्वीडनने फिनलंड व रशियावर प्रभुत्व गाजविले.

स्वीडन हा राजसत्ताक देश आहे. नॉर्वे व डेन्मार्क हे स्कँडीनेव्हीयन देशही राजसत्ताकच आहेत. त्यामुळे राजाच्या मृत्यूनंतर या पैकी एखाद्या देशाचा राजपुत्र आणून गादीवर बसवतात. हल्लीचे स्वीडीश राजघराणे १८१० मध्ये एका फ्रेंच सेनानीने






स्थापन केले. राजांचा जन्म पराक्रमापासून होत असतो हे खरे आहे.

राज्यमुत्ताकात प्रमुख आकर्षण म्हणजे अर्थात राज-प्रासाद. स्टॉकहोमच्या रॉयल ऑपेरापाशी आम्ही बसमध्ये चढलो. हे रॉयल ऑपेरागृह खरोखरीच रॉयल आहे. मोठी शानदार राजशाही इमारत आहे. इथूनच बसेस व बोटी सुटतात. या शाही नाट्य-गृहाशेजारीच प्रचंड राजप्रासाद आहे. त्यात सहाशे खोल्या आहेत. खानदानी वास्तुकलेचा हा एक नीटस नमुनाच शोभतो. जल-तटावरील याची शोभा अवर्णनीय आहे. ८७ वर्षांचे सहावे गुस्ताव राजे सध्या तेथे रहातात. राजवाड्यासभोवती उंच द्वारे आहेत. दोन सिंहांचे स्वीडीश राजचिन्ह सगळीकडे दिसते. हा राजवाडा बांधण्यास सतराव्या अठराव्या शतकाची ६४ वर्षे लागली. म्हणजे वर्षाला सुमारे दहा खोल्या बांधल्या गेल्या. आग्र्याच्या दयाळ बागेची आठवण झाली तिथेही एक संगमरवरी पूल खोदायला महिनेच्या महिने लागतात. काव्यकला म्हणजे स्फूर्तीचा झटका पण वास्तुकला म्हणजे सहनशीलतेची परीक्षाच होय, पहाणाऱ्याची नाही हं. खरोखरी सालंकृत वास्तुकला पहावी या प्रासादातच. वाड्याच्या संपन्न भिंतीवरील टॅपेस्ट्री मोगली वैभवाला लाजविते. मोठमोठी झुंबरे छतात झुलतात. स्वीडनच्या इतिहासातील समर-प्रसंग रंगविलेली पेंटींग्ज भिंतींना बोलक्या बनवितात. या राज-गृहातील मसलतखान्यांचा हॉल तर ऐश्वर्याची चरमसीमा आहे जणू. सोनेरी रंग, लाल मखमली खुर्च्या, हिरव्या मखमलीने मढविलेले प्रदीर्घ टेबल, त्यावर लाल बांधणीच्या पुस्तकांच्या भरीव रांगा, शेजारी सोनेरी कलमदान. संगमरवरी राजप्रतिमा या मसलत खान्याची मिजास खूपच वाढवितात. या दालनाच्या छतावरील सुंदर चित्रकृती पहाणाऱ्याला मंत्रमुग्ध करतात. अशा या वैभव-संपन्न स्वीडीश राजप्रासादांतून नाइलाजानेच बाहेर पडलो. या राजवैभवाचे कलात्मक आकर्षण वेड लावणारे आहे.

## सुंदर चित्रतारकांचे माहेरघर

नगर-दर्शन-बस रस्त्यावरून जाऊ लागली, रस्ते अत्यंत स्वच्छ. स्वीडीश लोकही फार नीटनेटके पोशाख केलेले आढळले. त्यांच्यावर अमेरिकन लोकांचे संस्कार झाले आहेत. पुष्कळ लोकांची घरे युनायटेड स्टेटसमध्ये आहेत. ७७ लाखांचे हे राष्ट्र लोकसंख्येने पुणे जिल्ह्यापेक्षाही कमी आहे. पण आधुनिकतेत फार प्रगति-शील. स्वीडनमध्ये लोखंड विपुल सापडते. किरुना येथील लोह-खाणीत अपार खनिजसंपत्ति आहे. किरुना हे जगातील सर्वात विस्तृत शहर आहे. तीन हजार चौरस मैल एवढे त्याचे क्षेत्रफळ आहे. पण यात वस्तीमात्र सुमारे चौदा हजारांची. स्वीडनमध्येच जगप्रसिद्ध एस. के. एफ. बॉलबेरींग कारखाना आहे. स्वीडीश प्रायमस स्टोव्ह तर जगप्रसिद्धीच आहे. येथील मोटारी बांधणीने फार स्मार्ट आहेत. येथील स्त्रियांप्रमाणेच ! जगाला सौंदर्याने व अभिनय-कौशल्याने वेड लावणाऱ्या ग्रेटा गार्बो, इन ग्रिड बर्गमन्, ग्राअग गार्सन अशा मरम चित्रतारका स्वीडननेच जगाला बहाल केल्या.

स्टॉकहोममध्ये व्हिएन्ना बुसेल्सप्रमाणे ट्राम दिसली नाही. मोटारी अथवा बोटी हेच प्रवासाचे साधन. घरांची छप्परे हिरवी-पोपटी आहेत. कारण ती ब्राँझची असल्यामुळे कालांतराने त्यावर गंज चढतो. हेलसिंकीला रिव्होली हॉटेलचे बाह्य कवच असेच ब्राँझच्या पट्ट्याचे आहे. त्यावरील हिरव्या गंजामुळे दुरून त्या लाकडी पट्ट्याच वाटतात. स्वीडीश मोटारींचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांचे नंबर पाच आकडी आहेत. नंबरापूर्वी आपल्याप्रमाणेच आद्याक्षरे आहेत; पण नॉर्वेत नुसत्या नंबरी मोटरीच नजरेस पडल्या. आकड्यांच्या आधी अक्षरे नव्हती. येथील टॅक्सीच्या पुढील भागी पिवळा बिल्ला दिसतो. एकंदरीत पिवळा रंग आणि टॅक्सी यांचा संबंध सर्वमान्य वाटतो. स्वीडनमधील पिवळा रंग आपण मुंबईत टॅक्सीच्या माथी मारला आहे इतकाच फरक. LEDIG ही झगझगीत अक्षरे कॅबच्या दर्शनी काचेवर दिसली की ती टॅक्सी खाली आहे असे समजावयाचे.

राजगृहातून निघाल्यानंतर वाटेत इंगल ब्रेक्ट चर्च पाहिले. आधुनिक स्वीडीश वास्तुकलेचा एक वैशिष्ट्यपूर्ण नमुना वाटला. चर्च बांधताना मध्ययुगीन वास्तुशास्त्राला डावलून आधुनिक पद्धतीची चर्चे बांधण्यास या शतकात युरोपमध्ये सुरुवात झाली. पश्चिम बर्लिनमध्ये असेच आधुनिक धाटणीचे प्रार्थना गृह मला पहायला मिळाले. उलट स्टॉकहोममधील रिदार होमचर्च पुरातन ढबीचे आहे. हे चर्च म्हणजे स्वीडनचे पॅंथीऑन-देवविश्व होय ! लंडनमधील वेस्टमिनिस्टर अॅबेप्रमाणे स्वीडनचे. दुसरा गुस्ताव बारावा कार्ल वगैरे राजांचे चिरनिद्रा स्थान या चर्चमध्ये आहे !

स्टॉकहोमच्या स्टॅंडहुसेटची-टाऊन हॉलची सुंदर इमारत मालारें तलावावर आपल्या लाल रंगाने तळपते. तिचा उत्तुंग टॉवर हा मुंबईच्या राजाबाई टॉवरप्रमाणे स्टॉकहोमचे टमटशीत नगर वैशिष्ट्य आहे. या प्रशस्त इमारतीचे प्रतिबिंब संध्यासमयी तला-वात तरंगताना आम्ही पाहिले. टाऊन हॉलच्या मूळच्या तांबड्या रंगावर संध्या छायांचा लाल मुलामा पाहून वाटते जणु गुलाबी






रमणी लाजली आहे. या टाऊन हॉलच्या भोवतालच्या बागेत सुंदर पुतळे आहेत. या भव्य इमारतीच्या पूर्वांगाला एक बांधेसूद ब्रॉंझ बाई आटोपशीर चबुतऱ्यावर उभी आहे. ती जलपरी दोन चवड्यावर उभी राहून समोरील मालार्दें तलावाच्या निळावंतीत उडी मारण्याच्या पावित्र्यात दाखविली आहे. अंगावर वस्त्र नाही, पण त्यावर निळसर गंज कुठे कुठे आढळला. जणु काही निळ्या पाण्यात क्रीडा केल्यानेच त्यातील नील रंगाने तिच्या कातडी-वर रंगसाज चढला आहे. पण छे, मारणार वाटते पुन्हा उडी ही त्या सरोवरात, तेवढ्यात टिपून घ्या जलराणीचा रेखीव क्रीडा अभिनिवेश डोळ्यांनी.

## चित्रकार राजघराणी

टाऊन हॉलच्या अन्तर्भागात स्वीडीश चितारी राजपुत्र युजेन याने रंगविलेली कलात्मक चित्रे पाहून मला आपल्या राजा रवि-वर्म्याच्या चित्रकलेची आठवण झाली. औंधच्या राजेसाहेबांनी काढलेली पौराणिक चित्रे आपल्याकडे गाजलीच. प्राचीन भारतात राजाना चित्रकला जरूर येत असे. कालिदासाने दुष्यन्त राजा विमनस्कपणे चित्रे काढीत बसलेला दाखविला आहे. राज-पुत्र युजेनच्या चित्रांचा विपुल साठा त्यांच्या रहात्या राजवाड्यात जुर गार्डन भागात आहे असे कळले, पण तो उघडा नव्हता.

जवळच नोबेल इन्स्टिट्यूटची इमारत होती. दरवर्षी दहा डिसेंबर रोजी सगळ्या जगात ज्याची अभिलाषा धरतात त्या नोबेल पारितोषिकाचा वितरण समारोह येथे होतो. नीलकंठाच्या गळ्यात हलाहलाचे अमृत झाले ही एक समुद्रमंथनातील भाकड-पुराण कथा वाटते. पण नोबेल पुरस्कारांचा इतिहास हेच तत्त्व प्रस्थापित करतो. नोबेल नावाच्या स्वीडीश शास्त्रज्ञाने विश्व-संहारक स्फोटक डायनामाईट विकून कोट्यवधी पैसा मिळविला. पण त्याने झालेला युद्ध विध्वंस पाहून अशोकाप्रमाणे उपरती होऊन १९०१ साली त्याने आपल्या कमाईचा न्यास करून प्रति-वर्षी जगातील उत्तम शास्त्रज्ञांना, लेखकांना देण्यासाठी पाच पारितोषिके कार्यवाहीत आणली. पदार्थ विज्ञान, रसायन शास्त्र, भिषग्शास्त्र, साहित्य यांना एक एक असे चार प्रचंड पुरस्कार ठेवले. शिवाय पाचवा पुरस्कार जागतिक शांततेसाठी जाहीर केला. भारतात रवींद्रनाथांनी गीतांजली या उत्कृष्ट काव्याबद्दल हे नेत्र-दीपक बक्षीस मिळविले. त्यानंतर रामनना पदार्थविज्ञान शास्त्रातील 'रामन परिणाम' या प्रकाश शास्त्रातील शोधाबद्दल हा पुरस्कार प्राप्त झाला. अलीकडे खुराणाना ते मिळाले. हा बक्षीस समारंभ स्वीडनच्या राजेसाहेबांच्या हस्ते होत असतो. सर्व जग इकडे दत्तचित्त असते. समारंभाचा हॉल मात्र आम्हाला पहाता आला नाही. पुन्हा बंद ! भारताला कधी काळी शांततेचा नोबेल नजराणा मिळेल अशी आशा करीत आम्ही बसने मिये गार्डन या स्टॉक-होममधील कलाउद्यानाकडे वळलो. बसमधील टीकाकारांचे धावते समालोचन पळत होते बसच्या चाकाबरोबरच ! वाटेत कॉन्सर्ट हॉलच्या समोरील ऑरफीयस या पुष्करणीवर धावती नजर टाकली. कार्ल मिये या विश्वविख्यात स्वीडीश शिल्प-शास्त्र्याने घडविली आहे ही जलदाणी. याच मियेच्या निवास-उद्यानात नंतर आम्ही गेलो. हे मियेचे कलात्मक घर स्टॉकहोम बंदराच्या पलीकडे सुमारे दहा मैल गेल्यावर लागले. वाटेत मोठा पूल पार करावा लागला, अर्थात आमच्या बसला.

एखाद्या साहित्यिकाला विशिष्ट पुस्तक प्रसिद्धी मिळवून देते. शेक्सपिअर म्हणजे हॅम्लेट, कालिदास म्हणजे शाकुंतल, हरी नारायण आपटे म्हणजे पण लक्षात कोण घेतो, तसेच कलाकारांच्या बाबतीतही पुष्कळ वेळा घडते. लीओनार्द दी विंचीचे नाव घेताच त्याची मुग्ध स्मयमुखी मोनालीसा डोळ्यासमोर येते. व्हॅनगॉकचे सूर्यफूल सगळ्यात उठून दिसते. रविवर्म्याची शकुंतला ! तशीच रोदँ या फ्रेंच शिल्पशास्त्र्याची 'दि किस' ही चिरंजीव कलाकृती. मिये हा रोदँचा शिष्य. १९५३ साली ८० वर्षाच्या ऐन उमेदीत दिवंगत झाला. ऐन उमेदीत म्हणण्याचे कारण तो शेवटपर्यंत शिल्पनिर्मिती करीत होता. १८९० पासून त्याचे शिल्पसर्जन सुरू झाले. त्याच्या निवासगृहात त्याने केलेला दुर्मिळ कलाकृतींचा संग्रह आहे. त्याच्या घराशेजारी इटालियन बाग बाल्टीक सागराच्या जलाशयावर झुलत आहे. फुलत म्हटलं तर सत्याला सोडून होईल. खाऱ्या पाण्यावर भूवनस्पतींची वाढ कमी होणार. निसर्गालासुद्धा खटपट तुरट करतं ना !



अनुक्रमणिका

## दिगंबर वरुणाचा वीसफुटी पुतळा

मियेंच्या जगप्रसिद्ध कलाकृती म्हणजे नेपच्युन किंवा वरुण देव. उर्ध्वबाहू विरोम्यैप अशा थाटात हा दिगंबर वरुणाचा ब्रांझचा वीस फूट उंचीचा पुतळा उभा आहे. इटालीयन उद्यानात वाल्टीक सागराकडे तोंड करून जणु त्याला पाणीपुरवठा करीत आहे. वरुणाच्या उजव्या हातात मोठा मासा आहे. त्याच्या तोंडातून स्फुरलेली जलधारा वरुणाच्या मुकुटधारी माथ्यावर सतत अभिषेक करीत असते. पाणी देवांगावरून खाली ओघळते. वरुण देवाला जणु मोत्याच्या माळाच घातल्या होत्या असा भास त्या सरत्या उन्हात झाला. वरुणाच्या वाम हस्तात शंख शुक्ती आहे. हा जलस्वामी वाल्टिकला जणु प्रभुरामचंद्राप्रमाणे सांगत आहे – हूं थांब पुढे येऊ नकोस. त्या निसर्गरम्य उद्यानांत मियेच्या कलाकृती कमळा-प्रमाणे ठायी ठायी फुलल्या आहेत. वरुण देवाच्या पाठीमागे पेगॅसस (काव्यदेव) घोड्याच्या पाठीवर उभा आहे! वेळ थोडा. बसवाल्याची कालमर्यादा संभाळीत हे शिल्पदर्शन आटपायचे होते.

परमेश्वराची विराट मूर्ती. डाव्या हातावर मानवाची छोटी प्रतिकृती. नारायण नराला विश्वरूप दाखवीत आहे अशी कल्पना आहे. मायकेल एंजलो या विश्ववंद्य शिल्पशास्त्र्याप्रमाणेच मियेची कला अर्थपूर्ण सहेतुक आहे. मायकेलच्या कलेचे भव्य दिव्यत्व, परतत्त्वस्पर्श मियेला लाभला आहे हे त्याच्या कलाकृती पाहून पटते. बायबलमधील व ग्रीक पुराणातील देव-कथावस्तू मियेने साकार केल्या आहेत. त्यात जिवंतपणा आणि जीवनाचा दृष्टिकोन दोन्ही आहेत. इटालियन उद्यानातील एका पुष्करणी-मध्ये महाबलीपुरम्‌सारखा प्रचंड बैल आहे. येशु खिस्तांनी बैलाचे रूप घेऊन सबंध युरोप खंड पाठीवर घेतले आहे, असे हे शिल्प-काव्य आहे. त्यातली सूचक चमत्कृती विलोभनीय वाटली. मियेचे काही पुतळे ब्रांझचे आहेत तर काही ग्रॅनाईट दगडाचे.

## व्यासांच्या प्रतिभेचा साक्षात्कार

माझ्या मनाचा ठाव घेणारी मियेची कलाकृती म्हणजे इंद्र-धनुष्यावर उभा असलेला ईश्वर. भगवान इंद्रधनुवर उभा राहून तान्यांची मांडणी करीत आहे असे दाखविणारे हे शिल्पातील महाकाव्य आहे. व्यासांच्या प्रतिभेचा साक्षात्कार झाला मला हे पाहून. आमच्या गाईडने सांगितले की युनोसाठी प्रतीक म्हणून ही कलाकृती मियेने तयार केली होती. त्याचा आशय असा की, ताऱ्यांनीही एकत्र बांधणारी परमेश्वरी शक्ती आहे, तशीच ही संयुक्त राष्ट्रांची एकता शक्ती दूरदूरच्या स्वयंप्रकाशित उर्जस्वल राष्ट्रांना एका दावणीत बद्ध करून ठेवील; पण हे प्रतीक चित्र युनो-तील एका गटाने अमान्य केले. कारण त्यांत देव आहे. इतक्यात वेळ भरल्याने घाईघाईने बसकडे पावले वळवावी लागली.

परतीच्या प्रवासात जूर गार्डनमधील वासा ही पुराणी युद्धनौका पाहिली. हिचा मोठा मनोरंजक इतिहास कानावर आला. १० ऑगस्ट १६२८ ला स्टॉकहोमच्या राजवाड्यासमोरील गोदीतून वासा बाहेर पडली. पण काही अंतरावर जाताच कलंडली व बाल्टीकच्या तळाशी गेली. १९६१ साली ३३३ वर्षांनी तिचा जुलो-द्धार करण्यात आला. ती नौका आता ठीकठाक करून प्रेक्षणीय वस्तू म्हणून निर्जल गोदीत उभी आहे. कारण ती पराक्रमी आहे. बंदरा-तच बुडण्याचा तिचा पराक्रम अपूर्व आहे. थोरांचा पराजय छोट्यांच्या विजयापेक्षाही अधिक इतिहासप्रसिद्ध असतो ना!

## कर्तव्यदक्ष पोलीस

बसचा फेरफटका करून मी पुन्हा वसस्थानकावर परतलो. नंतर जरा पायपीट केली. आज रविवार बाजार बंद, पण दुकानच्या काचेरी खिडक्यांत सजवलेल्या वस्तू पहात हिंडलो. बेल्जियम-प्रमाणे स्वीडनमध्येही काचेचा विपुल उपयोग विस्तृत प्रमाणावर केलेला आढळतो. रस्ता ओलांडताना एक छोटे मूल अडखळून पडले. त्याच्याबरोबर दुसरे कोणी नव्हते. पण इतक्यात नील गणवेश घातलेला पोलीस कुठून तरी झटकन पुढे आला व त्याने त्या मुलाला मार्गस्थ केले. स्टॉकहोमचे हे निळे पोलीस फूटपाथवर आड बाजूला जागृतपणे उभे असतात व प्रसंग पडल्यास पुढे येतात. सगळे काम निःशब्द. 'आई-बापांना पोरं जास्त झाली' वाटेत रस्त्यावर सोडा-यला' वगैरे स्वदेशी जीवनभाष्य ऐकू आले नाही.

सायंकाळ झाली. आता एकच कार्यक्रम शिल्लक होता. तो म्हणजे पुलाखालून स्टॉकहोमचे दर्शन. स्टॉकहोम हे मुळात वीस बेटां-वर वसलेले शहर होते. आता चौदाच बेटे आहेत. बाकीची सांधली गेली. या द्वीप समुद्राला जोडणारे सुमारे पाचशे पूल या आठ लाख लोकवस्तीच्या स्वीडीश राजधानीत उपलब्ध आहेत. एका वाफोरात बसून तासभर बाल्टीकच्या हिरव्या दिसणाऱ्या पाण्या-तून पर्यटन केले. पुलापुलाखालून बोट जाताना मजेदार शहारे अंगावर येत. मध्येच दुसरी बोट झटकन शेजारून जाई. किनाऱ्या-वरील विजेची रोषणाई – विशेषतः राजप्रासादासमोरील रस्त्या-वरील अक्षरशः नेत्रदीपक होती. दीपलक्ष्मी, दीपलक्ष्मीची शोभा खुलवीत होती.

एकंदरीत स्वीडन हा विकसित असा आधुनिक देश आहे. देशातील नव्वद टक्के रेल्वे विजेरी आहेत. स्वीडनमध्ये हॉटेल ट्रेन्स आहेत. त्यात रेस्टॉरंटस् असतात. के फिशचे कालवण हे स्वीडीश लोकांचे आवडते पक्वान्न.

सात ते नऊ वर्षांपर्यंतच्या मुलांना सक्तीचे शिक्षण आहे. कॉलेज शिक्षण फुकट. १८ व्या वर्षी सक्तीचे लष्करी शिक्षण प्रत्ये-काला घ्यावेच लागते. नंतर सत्तेचाळिसावे वर्ष लागेपर्यंत प्रतिवर्षी एक महिना लष्करी छावणीत रुजू व्हावे लागते. ६७ वर्षांवरील लोकांना वृद्ध-निवृत्ती वेतन शासनाकडून मिळते. समाजकल्याण फार पुढे गेलेले आहे. मला सांगण्यात आले की बस ड्रायव्हरला तीन हजार रुपये महिना पगार मिळतो व अकुशल कारागिराला मासिक रु. २५०० ! स्वीडनमध्ये पहाण्यासारखे खूप आहे. उत्तरेकडे लॅपलॅंड भागात मध्यरात्री सूर्यदर्शन घडू शकते. सर्व जगात प्रसिद्ध म्हणजे ५३ मैल लांबीची वासा स्की रेस होय. ती मार्चच्या १ तारखेला दरवर्षी होते.

[क्रमशः]







अनुक्रमणिका

# पलायन

●●●●●●

— अनिल शां. थत्ते

..."गेल्या तीन वर्षांत आपण एकत्र फिरलो, सिनेमा पाहिले, पण त्या काळात आपण एकमेकांना ओळखू शकलो नव्हतो, ती ओळख या एका आठवड्यातच पटली"... तिनं सांगितलं नि ती जायला निघाली...





"जया, ए जया. . . . उठ नं . . अग आठ वाजले."

"हो उठलेच. कायरे चहा झाला तुझा ?

"अं ऽ हं ! तुझ्या उठण्याची वाट पहात होतो. म्हटलं दोघं बरोबरच घेऊ चहा, बोलावू वेटरला ? "

"हं, चहाबरोबर खायला पण सांग काहीतरी.

"भूक लागलीय तुला ?

"थोडीशी. रात्री अजिबात जेवले नाही नं, डोकं गरगरतय त्यानं. . . . "

"अॅस्प्रो देऊ ?"

नको, थांबेल आपोआप काही तरी खाल्लं की. तू पण माग़व नं काही तरी. तू तरी कुठे जेवला आहेस रात्री. . . . "

"नको मला....भूकच नाही अजिबात.... थांब हं वेटरला बोलवतो मी......वेटर, ए वेटर ऽ . . . . "

"आया साब. बोलो साब क्या चाहिये ? "

"दो चाय और एक नाश्ता प्लेट लाना जल्दी."

"जी साब, साब पेपर मंगता है ? बाहर लडका आया है !

"भेज दो

"साहेब पेपर. "

"कुठला आहे ?"

"लोकसत्ता, मराठा, टाईम्स.

"टाईम्स दे, ...... हे घे पैसे."

"जयू, ए जया तोंड धुतलंस का तू ? हा पेपर ठेवलाय बघ टेबलावर, वाचत बस, मी जरा वेटरला बघून येतो. "

"साब चाय ."

"अरे ! इतक्यात आलास सुद्धा, मी तुलाच पहायला खाली निघालो होतो. बरं, ठेव टेबलावर. . . "

"अच्छा साब

"ए जया, अग पेपर काय वाचत बसलीस ? चहा निवून जातोय, तो घे पाहू आधी, अन् ब्रेडपण आहे बघ प्लेटमध्ये."







अनुक्रमणिका

"श.. र..द..

"का ग ? काय झालं ? अन् हे काय एवढ्या सकाळी तुला इतका घाम... तुझा चेहरा येवढा घाबरल्यासारखा.. काय झालं तुला जया असं एकाएकी ? "

"शरद... हे बघ मी म्हणत होते तसंच झालंय. "

का. य ?

पपांनी पेपरला जाहिरात दिलीय, मी हरवल्याची, फोटोसुद्धा दिलाय माझा पेपरात. हा बघ.... "

"हूं, मग आता .... "

"तूच सांग ना, काय करूया आपण."

"जीव देऊया एकाद्या पॉइंटवरून... "

"असं वैतागून नको रे बोलूस, खरंच सांग नं... काय करूया आपण......... "

"मी जे सांगितलं ते तू ऐकायला तयार नाहीस, मग मी काय सांगू ?"

"काय सांगितलंस तू ?"

"तेच ... काल रात्री तुला सांगितलं ते."

"अं हं ! मी नाही. मी नाही असलं काही करायची."

"येवढा माझ्यावर विश्वास नाही ?"

"आहे रे ! खूप विश्वास आहे पण भिती वाटते."

"कसली ?"

"काही भलतंसलतं झालं तर... "

"अग व्हावं म्हणून तर करायचं..... नाही तर तूच सांग आपलं लग्न कसं होणार? घरातून पळून आलोय आपण..... तुझे पपा मला पोलीसात द्यायच्या धमक्या देतात. माझ्या बाबांना मी नुसता दिसलो तरी कच्चा फाडून खातील. मग कोणाच्या पाठिंब्यावर लग्न करूया आपण ..... "

"रजिस्टर करूया ... "

"तू बाकी वेडपटच आहेस, अग साक्षीदार कुठून आणायचे.... "

"तो परवा पॉइंटवर भेटला होता तो माणूस म्हणत होता नं की पंचवीस रुपये द्याल तर दोघांना घेऊन साक्षीला येतो."

"हूं! लफंगा तो... त्याचं काय पंचवीस रुपये घेऊन सही ठोकून जाईल पळून. इथे बेड्या हातात पडतील... "

"त्या का ?"

"का म्हणजे काय तुला अजून अठरा वर्षं पूर्ण झालेली नाहीत. मी वीस वर्षाचा.... म्हणजे उद्या लग्न केलं तरी, तुला फसवलं म्हणून मीच जेलमध्ये जायचो."

"पण मी सांगेन की सगळ्यांना माझं याच्यावर प्रेम आहे म्हणून ....."

"कोर्टात चालत नाही ते अठरा वर्षाखालच्या मुलींना प्रेम करता येत नाही. त्या फक्त फसविल्या जातात असंच सगळ्यांना वाटतं.

"मग काय करायचं ?"

"आपल्या दोघांचं लग्न करण्याखेरीज काही गत्यंतर नाही. असा उपाय योजला पाहिजे... अन् मला तरी एकच उपाय दिसतो तो म्हणजे..... "

"नाही ! नाही ! तसलं काही मी करू देणार नाही तुला."

"कां ? आजवर आपण काय एकमेकाला कधी स्पर्शच करत नव्हतो... तू मला चुंबन देत नव्हतीस ? तासतास आपण सिनेमाच्या बॉक्समध्ये चाळे करतच होतो नं ? मग आताच तुला येवढं..."

"ते वेगळं होतं. हे म्हणजे... माझ्या साऱ्या आयुष्याचा प्रश्न आहे

"आजवर जे करीत होतो त्यापेक्षा फक्त एक पायरी खाली उतरायचं."

"शरद ही पायरी नाही रे, हे खोल पाणी आहे, या शेवटच्या पायरीवरून पुढे पडलेलं पाऊल थेट खोल पाण्यात नेऊन बुडविल."

"मग काय करायचं ते तूच सांग."

"नेरळच्या त्या भटजीला विचारलंस?"

"हूं ! दोनशे रुपये मागतोय. म्हणे उद्या पोलीसचं काही लफडे निघालं तर आम्हांलाच निस्तरावं लागेल तेव्हा अशा लग्नाला दोनशे तरी घेऊच."

"मग देऊया .... "

"पैसे किती शिल्लक आहेत माहितेय?"

"किती ?"

"सत्तर रुपये फक्त."

"सत्तरच रुपये ? "

"हो, मग आणखी किती उरायला हवे होते ? आज आठ दिवस झाले आपल्याला इथे येऊन. हॉटेलचा रोजचा चार्जच मुळी तीस रुपये आहे, शिवाय इतर खर्च..... माथेरान आहे हे. "

"छे मला तर बाई काही सुचतच नाही. शरद. मला नं. खूप खूप अस्वस्थ वाटतंय. काहीतरी वाईट होणार आहेसं वाटतंय.. मला रडू येतंय रे. .. शरद आपण उगाच पळून आलो.... पूर्वी चोरून का होईना पण निदान आनंदाने भेटता येत होतं... आता सगळंच गेलं.... बस् फक्त काळजी काळजी आणि काळजी. मला तर बाई वीट आला."

"अन् मला मोठा आनंद का होतोय पण आपण तरी काय करणार ? तुझे पपा, माझे बाबा, सारेच आपल्याविरुद्ध.... "

"पण तरी आपण येवढ्यातच पळून यायला नको होतं रे.. निदान तू बी. ए. व्हायला हवा होतास, नोकरी मिळायला हवी होती तुला "

"हो आणखी लग्न, चार पोरं नको का व्हायला ? म्हणे नोकरी तरी मिळायला हवी होती. तोपर्यंत तुझं लग्न व्हायचं राहीलं असतं का ? तुझे पपा तर रोज नव्या स्थळांच्या याद्या आणत होते......"

"अरे पण म्हणून काय लग्न थोडंच केलं असतं ?"

"त्याचा काय नेम

"पण लग्न माझंच ना व्हायचं होतं ? मी उभीच राहिले नसते लग्नाला."

"विश्वास नाही माझा. आईबापांनी थोडासा जरी धाक दाखवला तरी तुम्ही पोरी डोळे मिटून वाटेल त्याच्याशी लग्न करता."

"मग आता निस्तर तूच..."

"हो मीच सगळी काळजी करतो. तू झोप डाराडूर."

"असा गैरसमज नको रे करून घेऊस. मला समजून घे नीट. अरे तुला काळजी वाटते अन् मला का झोप लागते ? तुझी शप्पथ गेले चार दिवस मला स्वस्थ झोप नाही. सारखे पपा-मम्मी डोळ्यासमोर येतात नि भिती वाटायला लागते. वाटतं पपा मला जबरदस्तीनं ओढून नेतील तुझ्यापासून."

हूं, मला सुद्धा तसं वाटतं. . . ”

“म्हणूनच तू नीट जेवत नाहीस नं?”

“तू तरी कुठे जेवतेस पोटभर. . . एरवी हॉटेलमध्ये सुद्धा तू केवढं खायचीस... खूप सुकलीस सुद्धा येवढ्यात. . . . ”

“शरद रागावणार नसलास तर एक विचारते.”

“ काय ?”

“आधी सांग रागावणार नाही म्हणून..”

“बरं नाही.”

“आपण–आपण परत जाऊया ?”

“परत ? कुठे ?”

“मुंबईला, आपापल्या घरी

“जया. . . . ”

“नाही म्हणजे तू नको म्हणशील तर नको जाऊया पण- - - पण बघ विचार कर.

“तुझे पपा घेतील तुला घरात ? ”

“हो ऽ ऽ घेतील. मारतील खूप, तरीपण घरात घेतील. . . . त्यांनी मारलं तर बिघडलं कुठे, आपलेच तर पपा आहेत, रागावण्याचा मारण्याचा हक्कच आहे त्यांना. माही• का ?”

“जया तुला खरंच परत जावसं वाटतं?”

“नाही रे, पण इथे तरी आपण कसे नि किती दिवस रहाणार आहोत. आणखी दोन दिवसांनी तरी पैसे संपणारच. मग काय करणार आहोत आपण ?”

“मी परत जाईन मुंबईला नि मित्रांकडून पैसे जमवून आणीन.”

“नि मी इथं एकटी राहू ?”

“काय झालं ? मी दुसऱ्याच दिवशी पहिल्या गाडीने परत इथे येतो. . . बरं तू काही एकटी नाहीस. हॉटेलमधले इतर लोक आहेत मॅनेजर, वेटर, कितीतरी लोक आहेत की तुझ्यासोबत . . . ”

“शरद मी इथं एकटी रहायची नाही....”

“हे बघ असा अडाणीपणा करू नकोस. तुझा फोटो पेपरला आलाय. तू इथे नुसती जरा बाहेर पडलीस तरी सगळे तुला ओळखतील . . . . ”

“शरद, मी जीव देईन, पण इथं एकटी रहाणार नाही . . . ”

“कां – पण ? ”

“ऐकायचंय तुला ? ऐक तर मग प्रत्यक्ष माझा प्रियकर असूनही मी तुला जे दिलं नाही ते माझ्याकडून जबरदस्तीनं हिरावलं जात होतं. इथे माझ्यावर बलात्कार होत होता ”

“जया. . . जया. . . ”

“हो, मी सांगते यात तिळभर खोटं नाही . . शरद, हा पशू कोण होता माहित आहे ?

“कोण ? सांग लवकर, फासावर गेलो तरी हरकत नाही पण त्याचा जीव घेतल्याशिवाय रहाणार नाही. ”

“या हॉटेलचा मॅनेजर . . ”

“मॅनेजर ?

“हो मॅनेजर, परवा तू बाहेर गेला होतास, मी वाचत बसले होते तर तो एकाएकी आत शिरला अन् आत आल्या आल्या सरळ दार लावून घेतलंन . . .”

“मग तू . . तू ओरडली नाहीस ?”

“ओरडले नं, म्हणून तर वाचले . . मी ओरडले तर म्हणतो “पळून तर आली आहेस कशाला उगाच मिजास दाखवतेस ? चूप बस ! हॉटेलमधे वाटेल तितके दिवस राहिलात तरी एक पैसा घेणार नाही. फक्त . . . ”

“असं म्हणाला तो ?”

“असं नुसतं म्हणाला नाही, माझा प्रत्यक्षात हात पकडलान् त्यानं. . .”

“मग, मग . . . ”

“मग काय, त्याच्या हाताला कडकडून चावले नि त्याला दूर लोटून दार उघडून बाहेर धावत आले.”

“जया . . . जया तू मुला कां नाही सांगितलंस तेव्हाच हे . . . . ”

“काय सांगून उपयोग होता ?”

“का बरं ? मी त्याला ”

“ तू त्याला काही करू शकला नसतास. उलट त्यानंच तुला पोलिसांच्या ताब्यात दिलं असतं.”

“मग तू काय केलंस ?”

“काय करणार, तू येईपर्यंत रस्त्यावर वनवाशासारखी उभी राहिले.”

“जया, जया तू माझ्याकरिता किती सोसते आहेस ग. यु आर रिअली ग्रेट. एका लक्षाधीशाची एकुलती एक मुलगी तू. माझ्याकरता अशी वणवण फिरते आहेस. . .जया खरंच मी नोकरी धरतो. आपण दूर कुठेतरी जाऊ. सरळ मंगळसूत्र घालूनच त्या गावात उतरू. कोण विचारतो लग्न झालंय का नाही ते. मंगळसूत्र घालणाऱ्या प्रत्येक बाईचं लग्न झालंच आहे असं सगळे गृहीतच धरून चालतात. मग तिच्याबरोबर कुणी परका माणूस असला तरी तो त्यांच्या डोळ्यात खुपत नाही पण बिनमंगळसूत्राच्या बाईबरोबर प्रत्यक्ष भाऊ असला तरी लोक डोळे फाडून बघतात.”

“हूं. पण तुला कोण देणार नोकरी ?”

“का बरं, मी आता बी. ए. फायनलला आहे, इंटर ज्युनियरची सर्टीफिकीटं आहेत मला. ”

“पण तेही शेवटी घरीच आहे नं, म्हणजे घरी जाणं आलंच . . . ”

“... मग . . .मग जाऊया आपण घरी ?”

“खरंच तुला परत जावंसं वाटतं ?”

“तू म्हणालीस नं मघा.”

“पण तुला वाटतं का तसं ? नाहीतर उद्या म्हणशील, जयानं मला परत आणून फसवलं. ”

“आपण परत गेलो तर काय होईल ?”

“प्रथम मारझोड, मग माझं कॉलेज बंद. तुझं फक्त कॉलेजच सुरू, बाकी सगळं बंद. एखाद्या दिवशी माझं लग्न. . . . ”

“नाही ! नाही ! जया तुझ्याशिवाय मला जगणंच अशक्य आहे . . तुझं लग्न दुसऱ्या कुणाबरोबर . . छे ! ही कल्पनाच सहन होत नाही. मी जीव घेईन त्याचा.... जो कोणी तुझ्याशी लग्न करायला बघेल

त्याचा. . .नाही जया, आपण परत नाही जायचं. इथेच राहू या. नाही तर आणखी कुठे तरी जाऊया. पण परत नको जाऊया... तुझ्याशिवाय वेड लागेल मला....''

"शरद, माझंसुद्धा तसंच होईल रे.... मी पण तुझ्याशिवाय जगू शकत नाही. पण— पण इथे आपला निभाव लागायचा नाही रे . . . लोक सारखे वखवखलेल्या नजरेनं माझ्याकडे पहात असतात . . . मला भीती वाटते त्यांची. एकाद दिवशी तू नसताना भलतं काहीतरी व्हायचं. .शिवाय पैसे संपल्यावर काय करणार आहोत आपण...?''

"खरंच. काय करणार आहोत ? फक्त सत्तर रुपये शिल्लक आहेत. . . छे ! विचार केला की वेड लागायची पाळी येते. जया....''

"काय राजा

"आपण परत गेल्यावर काही दिवसांनी मी तुझ्या पपांना भेटायलो आलो तर ?''

"नाही रे, पपा तुला दाराशीसुद्धा उभे करणार नाहीत . . . मारतील सुद्धा एखाद्या वेळी ''

"इतके दुष्ट आहेत तुझे पपा ? ''

"ह्यांच्यापेक्षा जास्त म्हणून तर मी घाबरते.''

"दुसरा काही उपाय नाही ? ''

"आहे.''

"काय ?''

"आपण परत जायचं नि तू . . . ''

"मी काय. . . ''

"तू माझा नाद सोडायचास.''

"ज- - - या - - ''

"मी तरी काय करू रे ? मला का आपलं लग्न होऊ नयेसं वाटतंय ?..... सारं घरदार सोडून पळून आले मी तुझ्याबरोबर, ती का तुला सोडण्याकरिता ?''

"मग असं कां बोलतेस ? मला कसं-तरी वाटतं.''

"माझा तरी काय इलाज आहे शरद. तुझ्या करिता काय करायचं मी बाकी ठेवलंय . . . तुझ्याकरिता मी . . .''

"पुरे! पुरे! पुढलं सगळं पाठ आहे मला. तुझ्याकरिता मी घर सोडलं... दार सोडलं. . पैसे सोडले, बंगला सोडला पुन्हा पुन्हा नको ऐकवूस मला ते. वीट आलाय त्याचा.''

"मग नाही केलं का मी हे ? ''

"हो केलंस नं, पण म्हणून काय माझ्यावर उपकार केलेस का ? तुझंही माझ्यावर प्रेम होतंच ना ? मग काय झालं येवढा त्याग केलास तर, मी सुद्धा माझं घर, आजारी आई सगळं सोडून आलोय तुझ्या-करता. अन् आता तूच सोडून जायच्या गोष्टी करतेस ?''

"मी केव्हा केल्या रे ? उगाच भलतं-सलतं बोलशील तर ऐकणार नाही. तूच म्हणालास परत गेलो तर काय होईल.''

"पण परत जायची कल्पना कुणाची?''

"कुणाची ?''

"तुझीच.''

"मुळीच नाही ! तुझीच ! तूच म्हणालास पैसे संपत आले म्हणून . . . ''

"पण सांगितलं नं मी नोकरी करतो म्हणून.''

"अहाहा ! नोकऱ्या काय अशा वाटे-वर पडल्या आहेत ?''

"सरळ सांग नं तुला परत जायचय् म्हणून. ऐषआरामात श्रीमंतीत वाढलेली चैनी पोरगी तू. तुला कशाला कष्ट सोसवताहेत ! असं निघून जायचं होतं तर मला चल म्हणून कशाला म्हणालीस ? ''

"मी कुठे म्हणाले ? तूच म्हणालास आपण माथेरानला जाऊन लग्न करूया म्हणून . . . ''

"पण पैसे तूच आणलेस नं ?''

"तो काय माझा गुन्हा ?''

"नाही माझाच झाला. माझा फुकट बळी दिलास तू. तुझ्या चैनीकरिता मला झुलवत होतीस आता खरी वेळ आली तर निघून जायचं म्हणतेस.''

"अरे रहायची खायची व्यवस्था कर नं आपण अजून पाहिजे, तितके दिवस राहूया.''

"बस्. तू खायचं, प्यायचं, चैनीचं बघ. इथे माझा जीव जायची पाळी आली नि तू खायची चिंता कर.''

"मग काय नुसतं एकमेकांकडे पाहून आपलं पोट भरणार आहे, का एकमेकांच्या हृदयात आपण रहाणार आहोत.''

"माझी चेष्टा करू नकोस जया. . . ''



## वेड्याची पदयात्रा

वेड्याची पदयात्रा
आमच्या गल्लीत
एक वेडा आहे
तो एम्. एस्. सी. आहे.
एस्. एस्. सी.
ते
एम्. एस्. सी.
पर्यंतचा भयानक
अभ्यासक्रम
संपवतानाच तो
हाफमॅड झाला होता
नि नंतर बेकारीने
उपासमारीने पुरा
पागल बनला !
तो बिचारा आपला
पुरा पागलच बनला
आहे, आणि
'खोऱ्याने पैसा ओढायचा'
'खोऱ्यानं पैसा ओढायचा'
असं गाणे म्हणत
त्या 'खोऱ्या'च्या
शोधात
गल्ली बोळ, उकीरडे फुंकत
आणि बऱ्या 'खोऱ्या'तून
फिरतो आहे! –

–जयंत आंबेकर

"काय चेष्टा केली मी यात ? अन् तुला माझ्यावर असं सारखं चिडायचं असेल तर . . . ''

"तर काय ?''

"तर आपलं पटणं कठीण आहे.....'

"मग गेलीस उडत ! मला पर्वा नाही तुझी.''

"होऽ कां ? बरं झालं ! लग्नाआधी कळलं. म्हणूनच गेले आठ दिवस मी तुला

अनुक्रमणिका

अंगाला हात लावू देत नव्हते. मला वाटलंच होतं तू असा उलटशील म्हणून... माझ्या पैशावर इतके दिवस चैन केलीस.. सगळीकडे माझी बदनामी केलीस नि आता लागला साप गरळ ओकायला."

"जया, जीभ आहे म्हणून काय वाटेल ते बडबडू नकोस. तुझ्यापेक्षा माझंच नुकसान अधिक झालंय. घरादाराला मुकलोय मी. वर्षभर माझ्या अभ्यासाचं वाटोळं केलंस. आता तर मी परीक्षेत देखील पास होणं अशक्य आहे."

"त्यात माझा काय दोष. मी काही तुझा हात धरला नव्हता की अभ्यास करू नकोस म्हणून."

"पण माझं लक्ष तर डिस्टर्ब करत होतीस

"ते कसं बाई ? "

"रोज पिक्चर, हॉटेल, भटकणं यात."

"वा ! वा ! वा चांगल्या चोराच्या उलटया बोंबा आहेत. तूच पिक्चरसाठी व्याकूळ व्हायचास. त्या अंधारात तुला फाजीलपणा करायचा असायचा नं.



तूच सारखा मजा लुटायच्या मागे असायचास. तुला माझ्या रूपाची, पैशाची हाव होती. म्हणून प्रेमाचं खोटं नाटक केलंस तू. मला फसवलंस. . मला जन्मातून उठवायचा प्रयत्न केलास . आज मला कळलं तू काय लायकीचा आहेस. नीच ! हलकट ! मवाली !"

"जया. चालती हो इथून. माझी लायकी तू काढायची गरज नाही. तुझ्यासारख्या गर्विष्ट मुलीशी लग्न करण्यापेक्षा जीव देईन कड्यावरून . . . . ."

"अहाह ! तोंड बघ जीव देणाऱ्याचं, दर दोन मिनिटांनी जीव देण्याच्या अन् घेण्याच्या गोष्टी बोलतोस, एकदा तरी करून दाखव की. बरोबरच्या मुलीचं चार दिवस संरक्षण नाही करता येत तुला. तू काय मला जन्मभर सांभाळणार, हूं! प्रेम करतोय म्हणे."

"जया, तू परत जाऊ शकतेस. माझ्या सहनशक्तीचा अंत पहात इथे थांबू नकोस."

"ठीक आहे. जाते मी. तू रहा नाही तर जा. अकराच्या गाडीनं मी परत मुंबईला जाणार आहे."

"खुशाल जा

"-----"

"शरद, मी जाते . . ."

"ऐकू आलं का ? मी जातेय."

"खरंच जातेस ? ---"

"ही बॅग भरलेली दिसत नाही ?"

"जा. .. पण मला विसरू नकोस."

"वाटतं तुला मी विसरेन म्हणून ?"

"----"

"थांब पोचवायला येतो मी तुला. "

"तू रहाणार आहेस अजून इथं ?"

"उद्याचा दिवस, परवा वसईच्या मामांकडे जाईन, मग बघू काय ते . . . "

"चल मग स्टेशनपर्यंत . . . "

"जया खरंच जातेस तू ?"

"नको जाऊ का ? "

"नाही. . . म्हणजे गेलीस तरी चालेल... पण . . . . पण "

"पण काय ?. . . . . "

"तुला वाईट नाही वाटत ?"

"वाटतंय, पण तेवढं नाही. "

"कां ?"

"कारण आज आपण एकमेकांना जेवढं ओळखलंय तेवढं गेल्या तीन वर्षांत ओळखू शकलो नव्हतो."

"हं . . चल मी तुला पोचवून येतो."

"चल लवकर, गाडी सुटायची वेळ झाली." १००



अनुक्रमणिका

# भारतीय क्रिकेटचे संशोधन

— बाळ ज. पंडित



आपण ऑस्ट्रेलियाविरुद्ध कसोटी सामना जिंकला एकच. पण भारतीय क्रिकेटमध्ये शोध लागले अनेक! त्यामुळे कसोटीमालिका ऑस्ट्रेलियाने जिंकली असली तरी फायदा आपलाच झाला आहे असे म्हटले पाहिजे! संपलेला दौरा गाजवला तो ऑस्ट्रेलियाने नव्हे, आपण लावलेल्या शोधांनी! ह्या दौऱ्यात भारतीय संशोधनवृत्तीला आव्हान मिळाले आणि ते आव्हान स्वीकारून आपण नाना तऱ्हेचे शोध लावले. त्यातले काही थक्क करणारेही आहेत.

आपल्या पहिल्याच कसोटी सामन्यात शतक करणारा विश्वनाथ हा त्यातलाच एक शोध. विश्वनाथचा शोध हा महत्त्वाचा खराच. पण त्याहीपेक्षा काही मोठे शोध आपण या दौऱ्यात लावलेले आहेत.

मधल्या फळीत आतापर्यंत खेळलेला अशोक मन्कड हा खरा 'आघाडी फलंदाजच' आहे, असा शोध ह्या दौऱ्यात प्रथम लागला! आपण आघाडी फलंदाज असल्याचे खुद्द अशोक मन्कडलाही माहीत नव्हते! त्यालाही हा शोध नवा होता. आमले हे 'गुपित' निवड-समितीला कळले कसे असा कूट प्रश्न अशोक मन्कडप्रमाणेच भारतीय क्रिकेटच्या बऱ्याच हितचिंतकांना पडलेला आहे. आपल्यातले हे सुप्त गुण आधीच कळले असते तर आपण या पूर्वीच टेस्ट खेळलो नसतो का असे म्हणत अशोक मन्कड हल्ली हळहळत बसला असल्याचे समजते.

दोन तीन टेस्टमध्ये सतत राखीव गड्यातच राहिलेला सुरेंद्र अमरनाथही हल्ली "मी सुद्धा एक आघाडी फलंदाजच आहे" असे सगळ्यांना सांगत सुटला असल्याचे कळते! तोही आता लौकरच टेस्ट खेळेल असा विश्वास बाळगायला हरकत नाही!

परंतु शेवटच्या दोन्ही टेस्टमधील दोन डावात अशोक 'फेल' झाल्याने तो खरा कोण आहे याविषयी फेरसंशोधन होणार असल्याचेही नुकतेच खात्रीशीररीत्या समजले आहे. तो मुळात फलंदाज आहे की नाही याविषयी शंका व्यक्त करण्यात येऊ लागली आहे. तरी परंतु तो गोलंदाज असल्याचा शोध भारतीय कप्तानाला अद्याप लागलेला नसल्याने अशोक हा फलंदाज तरी आहे याविषयी सर्वांची खात्री पटेल असा विश्वास वाटतो.

अशोक मन्कडप्रमाणेच एकनाथ सोलकरलाही ह्या दौऱ्यात नवा आत्मसाक्षात्कार घडला आहे. आत्तापर्यंत तो मंदगतीची फिरकी गोलंदाजी टाकायचा. कधी काळी आपण आघाडी गोलंदाज बनू हे त्याच्या स्वप्नातही नव्हते. मंदगती-गोलंदाजाला अशी स्वप्ने परदेशात कधी पडत नाहीत. भारतात मात्र अलिकडे पडायला लागली आहेत. आपण एक आघाडी गोलंदाजसुद्धा आहोत हे एकनाथ सोलकरला कळले ते ह्या दौऱ्यातच! भारतीय क्रिकेटच्या दृष्टीने हाही फार मोठा शोध म्हटला पाहिजे. कारण एका एकनाथमुळे आता कितीतरी प्रश्न सुटले आहेत. यापुढे नवा आघाडी गोलंदाज बघायला नको. (त्यातून डावखोरा!) नवा बापू नाडकर्णी हुडकायला नको. नवा अष्टपैलु खेळाडू शोधायला नको. एकनाथने एका दगडात तीन पक्षी मारले! आपण पूर्वीपासूनच आघाडी गोलंदाजी का केली नाही असे एकनाथला हल्ली राहून राहून वाटत असल्याचे ऐकतो!

आमच्या देशात द्रुतगती गोलंदाज नाहीत हा शोध जुनाच आहे. पण आमच्या संघात द्रुतगती गोलंदाजांची जरुरीच नाही हा शोध मात्र यंदा नव्याने लागला आहे! द्रुतगती गोलंदाज नसतानाही सामने जिंकता येतात (किमान एक तरी) हे ठाऊक नसल्याने परदेशी संघ विनाकारण असे गोलंदाज शोधण्यासाठी वेळ आणि पैसा खर्च करीत असतात. हा अपव्यय व्यर्थ आहे असे इतर देशांना कळेल तेव्हा कळो. (लौकर कळलेले बरे. तेव्हाच आमच्या फलंदाजांना हायसे वाटेल!) आम्हाला मात्र हे तत्त्व पुरेपूर पटलेले आहे. हा नवा शोध लागल्याने यापुढे आता द्रुतगती गोलंदाजांची शोधाशोध थांबवण्यात येणार आहे! त्यामुळे हल्ली भारतातील क्रिकेट शिक्षकांनी आपला पवित्रा बदलला असल्याचे कळते. द्रुतगती गोलंदाज निर्माण करण्यासाठी जीवाचा आटापिटा न करता ते आता वेदी आणि प्रसन्ना निर्माण करण्याचे मागे लागले आहेत! आपल्या द्रुतगती गोलंदाजीचा इतःपर उपयोग नसल्याने अजित पै, गोविंदराज, चक्रवर्ती, रांजणे वगैरे मंडळीही आता मंदगती गोलंदाजी सुरू करणार असल्याचे आतल्या गोटातील वृत्त आहे. माणसाने उशीरा






का होईना शहाणपणा शिकायचा असतो तो असा! रमाकांत देसाईला आपण उगीच लौकर निवृत्त झालो असे वाटते आहे. मंदगती गोलंदाजी टाकायला शिकलो असतो तर अजूनही संघात खेळलो असतो असं तो मनातल्या मनात म्हणतो आहे! अजूनही उमेश कुळकर्णीने हा प्रयोग करून बघण्यासारखा आहे! मुंबईचा नवा फास्ट बोलर सैद अहमद हत्तिया हा भारतात आल्यामुळे पस्तावला असल्याचे ऐकतो! आपला इथे काही उपयोग नाही हे त्याला आता समजले आहे! द्रुतगती गोलंदाज संघात नसले तरी चालतात हे कळल्यामुळे भारतीय क्रिकेट कंट्रोल बोर्डाला हल्ली आनंदाच्या उकळ्या फुटल्या आहेत असे म्हणतात. बोर्ड द्रुतगती गोलंदाज तयार करण्यासाठी काही प्रयत्न करीत नाही ही टीका आता तरी बंद होईल असे बोर्डाला मनापासून वाटत आहे! मात्र टेस्ट सामन्यातून आता नवे चेंडू वापरण्यात येणार नाहीत हे कळल्यापासून क्रिकेटच्या सामानाचे दुकानदार आणि कारखानदार हवालदिल झाले आहेत, असे आमच्या खास प्रतिनिधीकडून नुकतेच कळले आहे!

फास्ट विकेटमुळेच क्रिकेट सुधारते हे तत्त्वही नव्याने खोटे ठरलेले आहे. त्यामुळे आता सगळे ग्राऊंडस्मन् विकेट मंदगतीलाच पोषक कशी ठरू शकेल याचा अभ्यास करू लागले असल्याचीही बातमी आहे. 'मंदगती-विकेटस्'मुळेच भारतीय क्रिकेटचे कल्याण होणार आहे हा शोध त्यांना नवा असल्याचे त्यांच्या निकटवर्तीयात कुजबुजले जात आहे.

भारतीय कप्तानाच्या बाबतीतही एक फार महत्त्वाचा शोध लागला आहे असे म्हटले पाहिजे. आपल्याशिवाय देशात चांगला कप्तान नाही हे आजच्या कप्तानाला कळून आले आहे आणि ह्याच्यासारखा वाईट कप्तान देशात दुसरा नाही हे इतरांना कळून चुकलेले आहे!

निवडलेल्या संघात खेळाडूंच्या 'आग्रहावरून' आयत्या वेळी बदल करता येतो हे आत्तापर्यंत कोणालाही माहीत नव्हते. परंतु मुंबईच्या टेस्ट सामन्यात ह्याबाबतीत एक महत्त्वपूर्ण शोध लागला. त्या टेस्टसाठी सुब्रतो गुहाची ११ खेळाडूत निवड झालेली होती. आणि वेंकटराघवन् हा राखीव गड्यात होता. पण आयत्या वेळी काय कोडी फिरली कोणास ठाऊक वेंकटराघवन् हा अकरा खेळाडूत जाऊन बसला आणि गुहा हा राखीव गड्यात आला!

याबाबत असे ऐकतो की, सामन्याचे दिवशी सकाळी निवड-समितीच्या सभासदाबरोबर गुहा खेळपट्टीवर गेला. (असे करता येते हे त्या दिवशी प्रथम कळले) आणि त्याला तेथे एक वेगळीच गोष्ट समजली. ही खेळपट्टी आपल्यासारख्या वेगवान् गोलंदाजाला पोषक नसून ती वेंकटराघवन्‌लाच अधिक अनकूल आहे हा शोध त्याला तेव्हा लागला.

झाले. निवड समितीने त्याचे मत शिरसावंद्य मानले. गुहा संघाबाहेर गेला आणि वेंकटराघवन् संघात आला. गुहाच्या त्यागाबद्दल, निस्पृहतेबद्दल, निस्वार्थीपणाबद्दल (वगैरे वगैरे) जिकडे तिकडे डांगोरा पिटला गेला! त्यात कुणाची तरी चूक कशीतरी झाकली गेली!

पण या साऱ्या प्रकारामुळे सुजाण प्रेक्षकांना एक नवी गोष्ट समजली. खेळपट्टीचे ज्ञान निवडसमिती सभासदापेक्षा खेळाडूलाच अधिक असते हा शोध त्या दिवशी लागला!

असे निरनिराळे शोध ऑस्ट्रेलियन् दौऱ्यात लागले. आघाडी फलंदाज हा तांत्रिकदृष्ट्या कच्चा असला तरी चालतो! त्याला त्या जागेवर खेळण्याचा पुर्वानुभव पाहिजेच असे नाही! मंदगती गोलंदाजालासुद्धा नवा चेंडू 'जुना' करता येतो! त्यासाठी द्रुतगती गोलंदाजाची आवश्यकता नाही! कप्तानाने फलंदाजीत धावा करायलाच पाहिजेत असं नाही! नेतृत्वातही त्याने आक्रमक पवित्रे घेतले नाहीत तरी चालतात! केवळ दोन गोलंदाजांवरच उत्तम कामगिरी करता येते! क्षेत्ररक्षणात 'चुका' केल्या तरी सामन्याच्या 'निकालात' काही फरक पडत नाही!.... वगैरे अनेक गोष्टी या दौऱ्यात नव्याने समजल्या, हे नवे ज्ञान आम्हास प्रथमच मिळाले! त्यातच आनंद मानायचा!

— वाईट एकच वाटते. ह्या सगळ्या गोष्टी झाल्या खऱ्या. पण त्या आपणास फार महागात पडल्या!.... परंतु त्याबद्दल कोणाला खंत आणि खेद वाटणार आहे? जे ह्याला जबाबदार आहेत त्यांना तरी?

— आणि शेवटी एका गोष्टीची रुखरुख लागून रहाते. हे इतके 'शोध' लागले. पण आणखी एकच शोध लागला नाही.... 'संघात भराभर बदल करून चालत नाही, आणि केवळ तरुण रक्तावर विसंबून भागत नाही!.... जुन्या अनुभवी खेळाडूतही काही रग शिल्लक असते, त्यांना एकदम डावलायचे नसते!'... ह्या सत्याचा शोध आपणास वेळीच लागला असता तर फार बरे झाले असते, नाही का? फार बरे झाले असते! पण आता त्याचा काय उपयोग?

• • •












## हिंदी चित्रपटांत शोभणारे प्रसंग

प्रियकर हाच पती लाभण्याचं भाग्य फारच थोड्या जणींच्या नशिबी असतं. एकाशी प्रेमसंबंध असताना दुसऱ्याशीच लग्नगाठ बांधली जाण्याचे प्रसंग प्राय: अनेकींच्या वाट्याला येतात. परंतु ज्याच्यावर नितांत प्रेम केलं, संसाराची रम्य स्वप्नं पाहिली त्याच्याच थोरल्या भावाशी विवाहबद्द होण्यातली व्यथा किती भयानक, दु:सह्य नि दारुण असते याचा बराचसा प्रत्यय अनिरुद्ध पुनर्वसु यांची 'थोरला हो' ही कादंबरी वाचताना येतो.

महाभारतातील द्रौपदीच्या व्यक्तिरेखेवरून ह्या लघुकादंबरीची कल्पना लेखकाला स्फुरली. दीर हाच पूर्वाश्रमीचा प्रियकर असणाऱ्या आणि विवाहानंतर एका दुष्टाच्या कपट कारवायांमुळे अनन्वित हाल व अन्याय सोसावा लागणाऱ्या एका अगतिक साध्वीची ही कथा आहे. आणि अत्यंत साध्या, सरळ निवेदनशैलीत लेखकाने ती मांडली आहे.

प्रेमिकांच्या गाठीभेटी ह्या अनेकदा गुप्तपणे होतात हे खरे असले तरी कोणतेहि प्रेम फार काळपर्यंत तसे गोपनीय रहात नाही. माधव आणि माया यांच्या प्रेमसंबंधाची सगळ्या चाळीला माहिती असताना, मोहनला – माधवचीच सदा काळजी वाहणाऱ्या त्याच्या सख्या भावाला–ह्याची गंधवार्ताही असू नये यावर विश्वास ठेवणे कठीण जाते.

रमण हा या दीर्घकथेतील खलनायक. त्याला या प्रेमप्रकरणाची पूर्ण जाणीव आहे. तो माधवला म्हणतो, " – अरे जारे वहिनीवाला! तुम्हा दोघांना चक्क किसिंग करताना बघितलंय् मी. – " मग तरीही तो मायाशी लग्न करायला कसा काय तयार होतो? कारण माधवला तो एकदा म्हणतो, "माध्या, तुला स्पष्ट बजावतो, मायाशी एक तुझं तरी लग्न होईल नाहीतर माझं तरी. साल्या, तू पहिली तिला फिरवलीस म्हणून आपण आपला क्लेम सोडला होता,




पण तू जर तिच्याशी लग्न करणार नसलास तर आपला क्लेम चालू! मानवी मनाशी, निदान भारतीय संस्कारात जडल्या घडलेल्या मनाशी हे कितपत सुसंगत वाटते!

अक्कांच्या (मायाची सासू) निधनानंतर मायाला होणारी जबाबदारीची जाणीव थोडक्या शब्दात समर्पकपणे वर्णिली आहे.– 'आज तो भार तिला जाणवू लागला होता. एकाएकी आपण खूप मोठ्या झालो आहोत, अक्कांचा आत्मा जणू आपल्याच शरीरात विलीन झाला आहे. अशी भावना तिला होऊ लागली.'

माधव व मोहन घरातून बाहेर गेल्यावर थोड्याच वेळात रमण येऊन मायावर बलात्काराचा प्रयत्न करतो, आणि नेमका याचवेळी माधव तिथे येतो. त्यांची झटापट होते. हा प्रसंग म्हणजे कादंबरीतील संघर्षबिंदू होय व इथूनच कादंबरीला एक वेगळीच कलाटणी मिळते. या अशा अत्यंत महत्वाच्या प्रसंगाचे वर्णन करताना, मोहनबरोबर बाहेर गेलेला माधव तात्काळ देवासारखा परत कां आणि कसा येतो त्याचा काहीच उलगडा लेखकाने केलेला नाही. हे आणि असेच, अनेक प्रसंग प्रचलीत हिंदी बोलपटात शोभतील असे सांकेतिक वाटतात. आणि तरीही अखेरपर्यंत ही कादंबरी वाचकांचे चित्त खिळवून ठेवते. कुतूहल वाढत ठेवण्याचे, उत्कंठा शिगेला पोहोचवण्याचे कौशल्य लेखकात असल्याचीच ही साक्ष!

**–कृष्णा बाळिंजकर**

('**थोरला हो**' लेखक : अनिरुद्ध पुनर्वसु; प्रकाशक : श्री. दीनानाथ पै; रंजना प्रकाशन, मुंबई–११; किंमत साडेचार रुपये)

## दुर्दैवाची सोबत

नियतीने जिच्या कपाळी दु:खपरंपरेचा लेख लिहिला आहे अशा एका स्त्रीच्या जीवनाचे करुण चित्र श्री. रमाकांत नंदर्गीकर यांनी आपल्या 'अंधेऱ्या आभाळाची सांवली' या कादंबरीत रेखाटले आहे. त्यांची ही पहिलीच कादंबरी आहे. पारू नावाच्या एका मुलीचा जन्म पापातून झाला. मुसळधार पावसात बेवारशी अर्भक म्हणून पडलेल्या पारूला जानबा नांवाच्या सुताराने सगळ्या गावाचा विरोध सहन करून आधार दिला. तिला लहानाचे मोठे केले. जानबाला दुसरे लग्न करावे लागले आणि तेव्हापासून पारूच्या दुर्दैवाला सुरुवात झाली. सावत्र आईचा जाच – वाढत्या यौवनाबरोबर स्वप्नरंजनामुळे ह्या जाचातून थोडा विरंगुळा – शंकरच्या सहवासातले थोड्या काळातील फसवे सुख – शंकरच्या स्वभावातल्या उग्रतेला त्याच्या दारूच्या व व्यभिचारी वर्तनाची जोड– तेथून पलायन–जानकीच्या सहवासात मायेची ऊब आणि संतुभामाने केलेली क्रूर फसवणूक – जानबाची पुनर्भेट – शंकरची भेट व अपघात–जगन्नाथाच्या सहवासात पुन्हा अंकुरलेल्या आशा आणि त्याच्या लग्नानंतरची निराशा यासारख्या अनेक प्रसंगांतून सुखदुखांचा पाठशिवणीचा खेळ खेळत तिच्या जीवनाचे धागे विणले गेलेले या कथेत आढळतात. या साऱ्यातही सुखापेक्षा दु:खच मोठे. कथेच्या शेवटी शेवटी तिला आपले जन्मरहस्य कळते. सुंदरा महारीण आणि सदोबा पाटील हे तिचे आईबाप असतात. अवसेच्या दिवशी पावसात इरल्याखाली सापडलेल्या पारूचा सांभाळ








करण्याला सदोबा पुढे आला असतो. सुंदरा व सैदोबा हे त्याला मदत करतात. मुलीवरून संकटे आली तर त्याच्या पाठीशी उभे राहतात. परंतु ती आपलीच लेक असल्याचे सांगण्याचे मनोधैर्य त्यांच्यापाशी नसते. लोकापवदासाठी ते टाळतात की कादंबरीकाराला हातचे पान राखून ठेवावेसे वाटले म्हणून सुदरा अखेरीस मरता मरता रहस्य सांगते, कुणास ठाऊक ! कादंबरीतील अनेक प्रसंग अधिकाधिक सहानुभूती वाटावी म्हणून मुद्दाम योजिल्यासारखे वाटतात. मुसळधार पावसात मूल सापडण्याचा प्रसंग हिंदी चित्रपटातल्यासारखा वाटतो तर संताजीच्या सांगण्यावरून जानवाने केलेले लग्न व मालन-संताजीच्या जानवासमोर चालणाऱ्या प्रणयचेष्टा अतिरंजित व अवास्तव वाटतात. संतुमामाचा कठोरपणा कारुण्य वाढविण्यासाठी योजिलेला वाटतो तर आत्महत्या करायला निघालेल्या पारूला ध्यानीमनी नसताना जानवाने भेटून वाचवणे हा योगायोग कादंबरीकाराच्या इच्छेनुसार आल्यासारखा वाटतो.

हे जरी असले तरी पारू, शंकर, जानकी, जगन्नाथ वगैरे पात्रांचे स्वभावचित्रण चांगले आहे इतकेच नाही तर कादंबरीत थोड्या वेळासाठी येऊन जाणाऱ्या अनेक पात्रांची थोडक्या शब्दात पण यथार्थ चित्रे लेखकाने 'उभी करून • वातावरणनिर्मिती उत्तम रीतीने साधली आहे.

**—माधव अत्रे**

(**अंधेऱ्या आकाशाची सावली**. ले. रमाकांत नंदर्गीकर. प्रकाशक: गोविंद विनायक देशपांडे श्री शारदा प्रकाशन, ५९४, नारायण पेठ, पुणे २ किमत ५ रुपये. )

## थोर पुरुषांच्या हत्या

'राजकीय हत्या' ह्या पुस्तकात एकूण सात राजकीय हत्यांच्या कथा सांगण्यात आल्या असून एक 'गंगाधरशास्त्री पटवर्धन' हा अपवाद वगळता बाकीच्या साऱ्या हत्या ह्या विदेशातल्या महापुरुषांच्या आहेत. त्या साऱ्या हत्यांच्या पार्श्वभूमीवर गंगाधरशास्त्री पटवर्धन ह्यांच्या हत्येची कथा ह्या पुस्तकात काहीशी शोभत नाही असे मला वाटते. बाकीच्या व्यक्तींनी त्या त्या देशातल्या वा जगातल्या राजकारणाला फार महत्त्वपूर्ण अशी देण (Contribution) दिली आहे. इतिहासांत त्यांची नावे महत्त्वानें नोंदली गेली आहेत. प्रे. लिंकन, केनेडी, ट्रॉट्स्की, यू आँग सॉन, दाग हॅमरशील्ड, सॉलोमन, बंदरनायके ह्या त्या व्यक्ति ! ह्या साऱ्यांच्या राजकीय कारणांसाठी हत्या झाल्या. त्यापैकी काही हत्यांचे गूढ आजही कायम आहे, पण त्या हत्यांनी एक भयंकर धक्का त्या त्या काळाला दिला हे निर्विवाद ! ह्या साऱ्या कथा सांगताना माहितीच्या कमजास्तपणामुळे सारखेपणा राहिलेला नाही. कदाचित जी माहिती ह्यात ग्रथित करण्यात आली आहे तिच्यापेक्षा अधिक माहिती लेखकाला मिळाली असेलही, पण पुस्तकाच्या स्वरूपामुळे ती मर्यादित करावी लागली असेल, पण लिंकन ट्रॉट्स्की, केनेडी यांच्या कथा अधिक माहितीपूर्ण व शैलीपूर्ण वठल्या आहेत. तर काही अगदीच त्रोटक रूपाने आल्या आहेत.

ह्या साऱ्या कथांमध्ये इतिहासकालीन गंगाधरशास्त्री पटवर्धन ह्यांचीही हत्या ग्रथित झाली आहे. त्या हत्येचा इतिहास फार रंजकतेने सांगितला आहे. ब्रिटिश राजनीतीचा एक मनोज्ञ साक्षात्कार त्यातून घडतो. आपल्या मनातही ते गूढ कायमच राहते. फरक येवढाच की, बाकीच्या महापुरुषांची हत्या ते एका न्याय्य कारणासाठी धडपडत असताना झाली त्यामुळे त्यांचे मृत्यू त्यांना अमर करून जातात. त्यांच्या मृत्यूने त्यांचे जीवन अधिक उदात्त होते. गंगाधरशास्त्री पटवर्धन ह्यांच्या कार्याचे स्वरूप तसे नाही. ते कर्तबगार, महत्त्वाकांक्षी आहेत, पण त्या कर्तृत्वाला कोणतेही उदात्त ध्येयवाद व राष्ट्रीय महत्तमता नाही. त्यामुळेच माझ्या मते त्या कथेचा इथला समावेश तितकासा सुसंगत वाटत नाही.

ह्या पुस्तकातले लेखन प्रामुख्याने 'हत्या'-विषयक असले तरी त्या निमित्ताने त्यांच्या कर्तृत्वशाली व्यक्तित्वाचा परिचय आपल्याला होतो. त्या पार्श्वभूमीवर त्यांच्या हत्येच्या कथांचा परिणाम खोलवर ठसा उमटवून जातो. हत्यातल्या बऱ्याचशा व्यक्ति आधुनिक इतिहासातल्या असल्याने त्यांत गांधी हत्या यायला हरकत नव्हती असे वाटते. 'गांधी हत्या' हाही आता 'इतिहास' झाला आहे. ऐतिहासिक• 'तात्पर्याने' त्याचे चित्रण आले असते तर तेही असेच वाचनीय झाले असते. अर्थातच आहे ह्या स्वरूपातही मराठी वाचकांच्या दृष्टीने एक आगळे पुस्तक लेखक-प्रकाशकांनी सादर केले आहे त्याबद्दल ते निःसंशय अभिनंदनास पात्र आहेत. पुस्तकाच्या शेवटी जी चित्रमाला जोडण्यात आली आहे तीमुळे पुस्तकाला परिपूर्णता आली आहे. पुस्तक संग्राह्य आहे.

**– प्रभाकर अत्रे**

(**राजकीय हत्या** – प्रा. रा. का. बर्वे. प्रकाशक : अशोक म. जोशी. ज्ञानराज प्रकाशन, ४२१, शनवार पेठ, पुणे २. मूल्य चार रुपये ).

## वाऱ्याच्या सुखद झुळुका

शं. ना. नवरे ह्यांचा हा नवा (व दहावा) कथासंग्रह ! ह्या संग्रहांत त्यांच्या एकूण तेरा कथांचा समावेश करण्यात आला असून त्या तेराही कथांची प्रकृती आपापल्या परीने वेगळी आहे हे त्या कथांचे प्रथमदर्शनी आकर्षून घेणारे वैशिष्ट्य होय! दुसरे वैशिष्ट्य म्हणजे ह्या तेराही कथात सार्थ अर्थाने जिला प्रणयकथा व शृंगारकथा म्हणता येईल अशी एकही कथा नाही. ती नसूनही सर्व कथा वाचनीय आहेत.

प्रस्तुत संग्रह लेखकाने कै. शशिकांत पुनर्वसू ह्या नामवंत कथालेखकाला अर्पण केला आहे आणि ह्या संग्रहातील 'नक्षत्र' ही कथा त्याने पुनर्वसूंची व्यक्तिरेखा म्हणूनच सादर केली आहे. पुनर्वसूंना ज्यांनी पाहिले होते, त्यांच्या सहवासात ज्यांनी काही काळ घालविला होता. त्यांच्या प्रसिद्धी पराङमुख स्वभावाचा, कमी





बोलणाऱ्या, लाजाळू स्वभावाचम ज्यांना परिचय झाला होता, त्यांना 'नक्षत्र' ही कथा खात्रीने आवडेल. पुनर्वसूंचे 'गाडी'चे वेड, त्यांच्या मनातल्या काही हळव्या जागा, स्वतःविषयीची अबोल वृत्ती, चित्र-कर्तृत्व, प्रेमळ स्वभाव ह्या छटांनीं ती कथा गहिरी झाली आहे. ह्या कथेने लेखकाने जणू मित्रऋणच फेडले आहे, असे मला वाटते.

ह्या संग्रहाचे दुसरे वैशिष्टय म्हणजे ह्यातल्या लहान मुलांच्या मानसशास्त्राचा उपयोग करून लिहिल्या गेलेल्या कथा! **जग, काळजी, वारा** ह्या कथांचा समावेश ह्यांत होतो. काळजी ह्या कथेतला अरुण—एक मुलगा हरवल्याची वार्ता वृत्तपत्रात वाचतो. त्या बातमीने तो अस्वस्थ होतो आणि मग कितीतरी दिवस तो वडिलांना त्यासंबंधीची चौकशी करून भंडावून सोडतो. हरवलेल्या मुलासंबंधीच्या विचाराने तो इतका भारावून जातो की, सतत तो त्याचाच विचार करीत राहतो. बाप सर्व उपाय करतो, पण त्या मुलाच्या विचारातून मुलगा सुटत नाही आणि बापाची काळजी वाढत जाते. शेवटी मुलालाच कल्पना सुचते, तो म्हणतो, बाबा तुम्ही 'पेपरमध्ये जाहिरात द्या. ज्यांची हरवलेली मुले परत आली असतील त्यांनी पुन्हा जाहिरात द्यावी. लोकांना उगाच वाईट वाटणार नाही' 'जग' ह्या कथेत बुन्दू बापाबरोबर मुंबईला जातो. मुंबईच्या त्या वैभवाने, माणसांच्या राहणीने त्याचे डोळे दिपतात. त्याला त्याचे बाबा बावळट, केविलवाणे वाटतात. त्याला मोटार हवी असते ती मोटारही ते स्वस्तातली स्वस्त घेतात. त्यामुळे त्याची खात्रीच पटते. एक अढी घेऊनच तो चालू लागतो. पण शेवटी मुले पळविणाऱ्या माणसाला जेव्हा ते मारतात व बुन्दूची सुटका करतात तेव्हा त्याला ते खूप मोठे वाटतात. त्याचे घर, गाव, आई, भावंडे यांचे सारे जग चांगले व मोठे वाटते व तो घरी जाण्याचा आग्रह धरतो. वारा ह्या कथेतला जैतु वारा नमल्याने पतंग उडत नाही म्हणून खंतावतो. बापाची चिंता वेगळी, त्याची वेगळी. शेवटी वारा सुरू होतो तेव्हा मुलगा नाचू लागतो आणि बाप जिवाच्या आकान्ताने ओरडतो 'येवा' आणि छपरावर पसरता येईल तेवढा देह पसरून कण्हणाऱ्या वयेसाठी आडोसा करण्याचा प्रयत्न करतो.

**'सूर्य झाला दीपिका'** ह्या कथेतली गुलाब गणिका आहे, पण गणिकेलाही मूल्ये असतात, तिलाही निष्ठा असतात. माणसाचेच मन असते. स्वाभिमान असतो. अपमान तिलाही टोचतो हे ही कथा दाखवून जाते. **द्यूत** कथेतला नायक आपले नटाचे स्वप्न साकारावे म्हणून आपल्या पत्नीला एका वाईट वातावरणाच्या कार्यालयात नोकरी करायला लावू बघतो. ती उवगते आणि त्याला ठामपणे सांगते की, "तू ध्येयासाठी नोकरी सोड. मी भांडी घाशीन, दारिद्र्य उपभोगेन, पण मला द्यूतात पणाला लावू नकोस." ती मुलगीही मनात घर करून जाते. **लागेबांधे** कथेतल्या तिघा भावांची जी कथा येऊन जाते तीही 'वास्तव' वाटते. मानवी स्वभावातील 'वर्मा'वर अचूक बोट ठेवून जाते. **तमाशा** कथेतली वातावरणनिर्मिती व माणसांचे स्वभावदर्शन मनोज्ञ वाटते. **श्रुणत रे पौरा** ह्या कथेतला गजानन ही एक वैशिष्टयपूर्ण व्यक्तिरेखा आहे असे म्हणता येईल. तो माणूस बोलतो कमी पण त्याला येते पुष्कळ! आणि त्यांतून साऱ्यांना एकामागून एक गोड धक्के बसतात ह्याचे गंमतीदार चित्रण ह्या कथेत आहे. **'मुलगा'** ह्या कथेत चित्रपटात बालनट म्हणून कीर्तीवंत होणाऱ्या पण त्यापायी सारे मृदुसंबंध, नाती यांना पारख्या होऊ पहात असणाऱ्या बापाची वेदना बोलकी झाली आहे.

ह्या संग्रहात नवरे यांची एक वेगळीच वाङ्मयीन प्रकृती दिसते. फँटसी यात नाही. हलकी विनोदी कथा यात नाही. ह्याही कथा आपण समर्थपणे लिहू शकतो हेच जणू नवऱ्यांनी ह्या पुस्तकाच्याद्वारे सिद्ध केले आहे.

**—प्रभाकर [illegible]**

[**वारा**: शं. ना. नवरे, प्रकाशिका रपे. जानकीबाई भावे. श्रीराम प्रकाशन. ठाकुरद्वार, मुंबई २. मूल्य चार रुपये.]

**एक नवीन होळी!**



**आग आणि बंब दोन्ही एकदमच!**

(पान १८ वरून–**परिसंवाद**)

आपल्या प्रश्नातील प्रस्थापित या शब्दाने शासनकर्ते, राज्यकर्ते किंवा त्या त्या क्षेत्रातील अधिकारी व्यक्ती असा अर्थ ध्वनित केला असावा. त्या दृष्टीने पाहिले तर काल-मान-परिस्थिती-वय आदि गोष्टींचा विचार करून या बंडखोरांना संधी देण्याचा प्रश्न उद्‌भवतच नाही. कारण आज जे प्रस्थापित आहेत ते त्यांच्या पूर्वी एकेकाळी बजावलेल्या कर्तबगारीमुळे अधिकारपदाची सूत्रे आपल्या हातात आणण्यासाठी त्यांनी केलेली धडपड, मेहनत या साऱ्या कर्तृत्वाने त्यांच्या जीवनाचा एक कालखंड व्यापून गेलेला आहे आणि त्या सर्व श्रमाचे फळ म्हणून ते आज 'प्रस्थापित' म्हणून स्थानापन्न होण्याचा मान उपभोगीत आहेत. आपल्या कुवतीप्रमाणे त्या त्या क्षेत्रात ते आपला अधिकार गाजवीत आहेत. हा संचिताचा ठेवा त्यांनी जो स्वतःच्या अपरंपार श्रमाने आणि मेहनतीने मिळविला तो काही केवळ उपभोग घेण्यासाठी नव्हे, तर तेव्हढी सामाजिक जबाबदारी आपल्या शिरावर घेण्याचा विडाच त्यांनी उचलला. अशी परिस्थिती असल्यामुळे ती जबाबदारी तितक्याच आत्मविश्वासाने आणि कर्तृत्वशक्तीने पेलण्याइतके कोणी आजच्या बंडखोर तरुणांमध्ये सापडणे, म्हणजे एक अपवादात्मक गोष्ट म्हणावी लागेल. आजच्या बंडखोर तरुणाची अवस्था म्हणजे दिशाहीन आणि विमनस्क अवस्थेत उतू जाणाऱ्या रंगेल गड्याची आहे. सळसळते रक्त, अंगात तारुण्याचा जोम, रंगेलपणा, बेछूटपणा आणि कुणाशीही दोन हात करण्याची ताकद यामुळे त्याच्या कर्तृत्वाला वाव मिळण्यासारखी कोणतीच गोष्ट नसल्यामुळे ही एक प्रकारची दाबली गेलेली सामाजिक शक्ती आज उफाळून वर येऊ पहात आहे, परंतु तिला अचूक मार्गदर्शनाची दिशा आणि योग्य प्रकारे वळण लावून तिचा समाजाच्या उत्कर्षासाठी आणि उद्धारासाठी प्रयत्नच कोठे दिसून येत नाही. त्या दृष्टीकोनातून अशा तरुणांना मार्गदर्शनाखाली अशा प्रस्थापितांनी आपल्या मदतीला घ्यावे, त्यांच्यात आत्मविश्वास निर्माण करावा व त्यांचा विश्वास संपादन करावा. कारभाराच्या बाबतीतील आपला अनुभव त्यांना जमा करू द्यावा व 'प्रस्थापित' या संज्ञेला ते पात्र होऊ शकतील इतकी त्या बंडखोर तरुणांची तयारी करून मगच त्यांनी निवृत्त व्हावे असे कोणीही सुबुद्ध म्हणेल. बंडखोर तरुण म्हणजे साहित्यक्षेत्रातला तरुण असे जर विधान केले तर मात्र लगेच दुसऱ्या एका महत्त्वाच्या गोष्टीकडे आपले लक्ष वेधते. वाचकवर्गाची एक प्रकारच्या बौद्धिक अथवा वैचारिक पातळीवर मनोभूमिका तयार करणाऱ्या लेखकांचा जो एक वर्ग आहे त्याला अनुलक्षून हे विधान आहे असे मानता येईल.

**एकाच नाण्याच्या दोन बाजू**

'निवृत्त होणे' हा शब्दप्रयोग सर्वसामान्यपणे नोकरीच्या बाबतीत केला जातो. तेव्हा 'कलावंताने निवृत्त होणे' म्हणजे काय? या आपल्या प्रश्नातील 'सर्वसामान्यतः निवृत्त होणे हा शब्दप्रयोग नोकरीच्या बाबतीत केला जातो' या विधानावर माझे दुमत होईल. निवृत्त या शब्दाला फार मोठा, आणि गंभीर अर्थ आहे व या शब्दाचा वापर, विचार आणि उच्चार यांच्यामागे जीवनातील आचारालाही अत्यंत मौलिक महत्त्व प्राप्त होते. जीवनाचा विचार करताना भारतीय तत्त्ववेत्यांनी दोन विरोधी प्रवृत्तींना अनुलक्षून हे दोन शब्दप्रयोग केले आहेत त्यापैकी निवृत्ती हा एक शब्द आहे. अध्यात्मिक वाङ्मयात याची सखोल चर्चा सापडते. प्रवृत्ती ही प्रक्रियाप्रधान, जीवनाचा उत्कर्ष, व्याप, पसारा वाढविण्यासाठी आवश्यक त्या सर्व व्यवहारांना चेतना देणारी, सचेतन रूप प्राप्त करून देणारी आणि सोप्या सरळ भाषेत जीवनविषयक भौतिक आणि व्यावहारिक पातळीवर विस्तारवादी अशी आचार-विचारसरणी होय. याविरुद्ध दुसरे मूलतत्व आपल्याकडील तत्वचिंतकांना सापडले ते म्हणजे निवृत्ती. आयुष्याच्या इवल्याशा कालखंडात आहे हे सर्व मिथ्या आहे त्यामध्ये धडपड करून आपल्या आयुष्यातील व्याप वाढविण्यापेक्षा ईश्वर चिंतनात अथवा व्यावहारिक जगाच्या रहाटगाडग्यातून आत्मिक शांती, मानसिक समाधान आणि अध्यात्मिक स्थैर्य प्राप्त करण्यासाठी धडपडणारी प्रवृत्ती होय. भौतिक आणि अध्यात्मिक दृष्टीकोनातून या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत व तसे मानणे श्रेयस्कर ठरेल. 'कलावंताने निवृत्त होणे' हा शब्दप्रयोगच मुळात अयोग्य वाटतो. कलानिर्मिती करावी अथवा करू नये हा कलाकाराचा वैयक्तिक आणि स्वतंत्र हक्क आहे त्यावर आक्रमण करण्याचा कोणालाही अधिकार नाही. कलावंताची कलानिर्मितीची प्रक्रिया हे एक गहनगूढ कोडे आहे, ज्यामध्ये स्वतः कलावंतालासुद्धा अनुभव घेत असताना अनुभवांचे पृथक्करण करून बौद्धिक पातळीवर ठोकताळे मांडणे सर्वस्वी अशक्य असते. त्या दृष्टीने प्रतिभाशक्ती पल्लवीत असताना आणि कलाकृतीचे सृजनात्मक आविष्कार होत असतानासुद्धा त्यामध्ये आळस करणारा कलावंत हा कलावंत नव्हेच तर तो एका अनुभवापासून पारखा–च्युत होणारा सर्जनशक्तीच्या अनुभवापासून दूर जाणारा असा सामान्य माणूस ठरेल. मात्र त्याच क्षणी त्याने त्या सर्जनशीलतेच्या आवाहनाला साथ देऊन आपल्या भावनात्मक सजावटीने एखादी कलाकृती निर्माण केली तर निश्चितपणे कलेच्या इतिहासात ती अजरामर घटना ठरू शकते हे अपूर्झा, पिंगा किंवा चाफा बोलेना इत्यादि कलाकृतींमधून स्पष्ट ठरेल अथवा सतारीचे बोल यामध्येही केशवसुतांनी कलाकृतीनिर्मितीच्या प्रक्रीयेचे सुंदर व रम्यमधुर वर्णन केले आहे ज्यामध्ये श्रेष्ठ श्राव्य अनुभूतींचा काव्यातील नादमाधुर्यात प्रथित करून अक्षरशः 'दिड दा दिड दा दिड दा दिड दा' असे बोल ओळीत घेऊन संगीताचा वेगळा अलंकार काव्यात आणला आहे. यावरून कलानिर्मिती ही एक प्रक्रीया आहे ही गोष्ट स्पष्ट होईल व ठोकळेबाज, स्थिर अशी वस्तू नसून सातत्याने प्रवाहीत अशी बदलत्या घटनांची मालिका आहे, सृजनशक्तीचा, जी साऱ्या विश्वालाच






खेळवते आहे, तो एक आविष्कार आहे अशा विचारांच्या बैठकीवरच अशा तऱ्हेच्या प्रश्नांचा विचार करावा लागेल.

या बंडाची प्रक्रीया ही तीव्र स्वरूपात दुसऱ्या महायुद्धानंतर सुरू झाली. पहिल्या महायुद्धाने असलेली प्रस्थापित साम्राज्ये उध्वस्त होऊ लागली, जमीनदोस्त होऊ लागली, एका मागोमाग एक विलयाला गेली आणि जनक्रांतीच्या या भयानक वणव्यात त्या साम्राज्यांच्या आगीचे लोळ आकाशात विरतात न विरतात तोच दुसऱ्या महायुद्धाने उसळी मारली आणि दुसऱ्या महायुद्धाचे ज्या ज्या बंडखोर तरुणांनी प्रत्यक्ष अनुभव घेतले त्यांनी आपल्या कलाकृतीद्वारे विदारक अशा कलाकृती निर्माण करून मानवी क्रूरतेची परिसीमा अशा ठरलेल्या या प्रवृत्तींना प्रकाशात आणले तर दुसऱ्या महायुद्धाने त्या प्रवृत्तींचा नंगा नाच सर्वत्र सुरू केला. दोन महायुद्धांच्या कालखंडामध्ये मानवी जीवनाची कुतरओढ इतकी झाली की जीवनाबद्दल घृणा, तिरस्कार, एक प्रकारची बेछूट वृत्ती माणसाच्या मनात निर्माण झाली. जीवनाला शाश्वती नाही या वैफल्यभावनेतून आला दिवस सुखाचा अशी मनोवृत्ती निर्माण झाली आणि आजच्या नवकलेमध्ये त्याचेच प्रतिबिंब स्पष्टपणे आविष्कृत होऊ लागले. साहित्यक्षेत्रात (मराठी) मध्ययुगीन क्रांतीची लाट ओसरते न ओसरते तोच मढकरांनी नवतेच्या बीजाची पेरणी महाराष्ट्र साहित्यप्रांतात केली आणि त्यांच्याच जोडीला एक सामाजिक दृष्टीकोन असलेला अथवा समाजाभिमुख साहित्यिक वर्ग निर्माण झाला. या बंडखोरांनी साहित्यमूल्यांच्या मूलभूत प्रश्नावरच प्रथम घाव घातला आणि नजरेसमोर असलेल्या, भासणाऱ्या, जाणवणाऱ्या आजच्या भयानक परिस्थितीचेच विश्वरूपदर्शन सत्याला अनुसरून रोखठोकपणे वाचकांना सादर करण्याची उठाठेव केली. या बंडखोर साहित्यिकांच्या साहित्यनिर्मितीबरोबरच बंडखोर तरुणांचा एक वाचकवर्ग निर्माण झाला जो आज स्वतःला बंडखोर म्हणवीत आहे व हा आजचा बंडखोर तरुण म्हणजे ज्याबद्दल आतापर्यंत विवेचन केले तो होय.

या बंडाच्या प्रक्रियेतून सारीच दैवते फुटतील आणि एक भयाण पोकळी निर्माण होईल असे पुढील प्रश्नात विधान केले आहे. त्यासंबंधी सांगावयाचे तर सारीच दैवते फुटतील ही जी भीती व्यक्त केली जात आहे ती माझ्या मते निराधार आहे. प्रथमतः दैवते या शब्दाचाच नीट व त्या पातळीवर विचार व्हावयास हवा. दैवते कशाला म्हणावयाचे ? अध्यात्मिक दृष्टीकोनातूनहा शब्द वापरला आहे किंवा कलावंताने त्याच्या कलासाधनेतील ध्यासधारणेला उपयुक्त पडावे म्हणून मानलेले तत्त्व अथवा सगुण रूपातील आराध्य दैवत या अर्थी वापरला आहे या गोष्टी ठरविल्यानंतरच मग या प्रश्नाकडे शिरता येण्यासारखे आहे. दैवताचा सर्वसामान्यतः अर्थ म्हणजे रक्षणकर्ता अथवा प्रतिकूल परिस्थितीवर मात करून देणारी दैवानुकूल अशी शक्ती. देव-देवता आणि अध्यात्मिक सार्वभौमत्व या गुणांनी समृद्ध अशा भारतामध्ये देवतांनाही तोटा नाही, देवतांच्या भक्तगणांनाही तोटा नाही. (एक शहाणे म्हणतात 'अबब, हे तेहतीस कोटी म्हणजे कितीतरी झाले, छेः छेः छेः अरेच्या, एव्हढे काय करायचे आहेत आपल्याला. आपल्याला बुवा एकपण नको') एका युगामध्ये तर देव-देवतांचे थोतांड इतके माजले होते आणि गरीब जनतेवरील अन्याय, अत्याचार इतक्या शिगेला पोहोचला होता की धार्मिक चळवळीच्या ऐन सुरवातीसच मच्छींद्रनाथांना आपल्या बंडखोरीच्या कार्याला सुरवात करावी लागली व धर्म-देव—मंदिरे-साधना-पूजा-शिक्षण आणि भक्ती यांचा अधिकार गरीब जनतेलासुद्धा आणि अस्पृश्यांनासुद्धा आहे अशा तत्त्वांचे प्रतिपादन करून आपली शिष्यपरंपरा निर्माण करावी लागली. धार्मिक असमानता शिखरावर पोहोचल्यानंतरच या बंडखोरीला सुरवात झाली व ती प्रस्थापितांविरुद्धची एक नांदी मानावयास हरकत नाही.

**मानली तर दैवते, नाही तर......**

जीवनात दैवतांना जरूर स्थान आहे, परंतु ही दैवते जर मानवाला केवळ भयाच्या पारड्याखाली दाबून ठेवण्यासाठी उपयोगात आणली जात असतील तर ही दैवते नसून ते नुसतेच पुतळे आहेत असे म्हणावे लागेल. बंडखोरांच्या बंडाच्या प्रक्रीयेतून दैवते फुटण्याची शक्यता तर आहेच, परंतु ही दैवते फुटण्यापेक्षाही अत्यंत भयंकर अशा घटना प्रत्यक्षात घडत असताना या दैवतांच्या भीतीचा प्रश्न निर्माण व्हावा ही चुकीची व सारासार विचारसरणीला न पटणारी अशी गोष्ट आहे. कलावंताच्या बाबतीत एक आराध्य दैवत असते ज्याची उपासना कलावंत आयुष्यभर करीत असतो. कलावंताचे सारे जीवन म्हणजे त्या दैवताची चाललेली आराधना, उपासना असते. व अशी दैवते म्हणजे काही दैवी शक्तीसुद्धा असण्याची शक्यता आहे. ज्याप्रमाणे कालीदासाचे आराध्य दैवत महांकाली होती निच्या कृपाप्रसादाने सरस्वती त्याच्यावर प्रसन्न झाली. याज्ञवल्क्याचे आराध्य दैवत शारदा देवी होती, जिच्या नावाचा उल्लेख आपल्या सरस्वती स्तोत्रात त्यांनी 'जगन्मातर्नमोनैव' असा केला आहे. आजच्या कलावंतांना अशा प्रकारचे दैवत आहे किंवा











नाहीं मला कल्पना नाही, परंतु आजच्या बंडखोर कलावंताने परंपरा निश्चितपणे पाळल्या आहेत आणि निश्चित तत्त्व डोळयासमोर ठेवून कलेची सेवा केलेली आहे, हे केशवसुतांपासून—बी कवींपासून तो आचार्य अत्रे-मर्ढेकर-खांडेकर-कुसुमाग्रजांपर्यंत सर्वांचे कलाक्षेत्रातले कार्य पाहून कोणीही म्हणू शकेल. अर्थात अशा प्रकारची जी आराध्य दैवते जर सर्वत्र फुटली तर एखादी भयाण पोकळी निश्चितपणे निर्माण होईल. आजच्या काळात तर ती निश्चितपणे झाली आहे आणि आजचा बंडखोर हा कुठल्याही साचेबंद प्रवृत्तीला न जुमानणारा आणि स्वतःचे भावनाविष्काराचे सार्वभौम हक्क-अधिकार प्रस्थापित करणारा असा बंडखोर तरुण झाला आहे. तेव्हा आजच्या समाजाच्या चौकटीमध्ये हा बंडखोर तरुण अशा स्वरूपाचा असल्यामुळे एखाद्या समग्र राष्ट्रजीवनात आमूलाग्र क्रांती करणारे बदल घडवून आणण्याइतपत सशक्त आणि संघटीत नाही ही गोष्ट निर्विवाद आहे. थोडक्यात म्हणजे हे बंड संपूर्णतया वैयक्तिक पातळीवर व्यक्त केले गेलेले कलात्मक आविष्कार आहेत व त्यामध्ये व्यक्तिजीवनाच्या विविध पैलूंचे प्रकाशझोत आहेत. अशा प्रकारचा एक कलावंतांचा वर्ग आज प्रत्येक राष्ट्रात, प्रत्येक देशात आणि प्रत्येक काळी निर्माण झालेला आहे. परंतु अशा प्रकारच्या कलावंतांनी आपल्या यष्टीजीवनाचा क्षणभर त्याग करून समष्टीजीवन अनुभवण्याचा प्रयत्न केल्यास आणि निश्चितपणे एकच ध्येय डोळयासमोर ठेवून त्यानुसार कलानिर्मिती केल्यास अथवा त्याहीपेक्षा स्पष्ट सांगावयाचे म्हणजे कोणतेतरी एक आराध्य दैवत आपल्या डोळ्यांसमोर ठेवल्यास त्यांच्या संघटीत प्रयत्नांमधून मात्र राष्ट्रजीवनात आमूलाग्र क्रांती करणारे बदल घडू शकतील. अर्थात् कलावंताचे प्रयत्न या दृष्टीने राष्ट्रजीवनातील सर्वच भागावर परिणामकारक होऊ शकतील असे नाही. कलावंताचे मुख्य क्षेत्र म्हणजे सांस्कृतिक क्षेत्र होय आणि त्यामुळे राष्ट्रजीवनातील सांस्कृतिक पोषणाला पूरक असेच कार्य त्यांच्या कलेच्या साधनेतून होऊ शकेल. राष्ट्रजीवनात क्रांती करणारे बदल परिस्थिती घडवीत असते. त्या क्रांतीचा मागोवा घेत जर कलावंत त्या युगाच्या पुढे जाऊ शकला नाही तर तो अपरिपक्व कलावंत म्हणावा लागेल. प्रगल्भ प्रज्ञा, अपार विद्वत्ता आणि उत्कट भावनात्मकता या विविध गुणांनी संपन्न आणि अध्यात्मिक उन्नतीची तळमळ असलेला व ज्ञानेश्वरांच्या भाषेत सांगावयाचे तर स्थितप्रज्ञ असा जर कलावंत राहू शकला तरच राष्ट्रजीवनातील क्रांतिकारक बदलांना त्याच्या जीवनाची थोडीफार मदत झाली असे म्हणता येईल. आजच्या बंडखोर तरुणांचे बंड हे थोडक्यात म्हणजे पाश्चिमात्य संस्कृतीला भूललेल्या आणि त्या संस्कृतीच्या स्वैराचारी वृत्तीलाच स्वातंत्र्य संबोधून स्वतः त्यात दंग-गुंग रहाण्याचा प्रयत्न करून जीवनातील अनुभवास येत असलेली विफलता नष्ट करण्याचा प्रयत्न करणाऱ्यांचा आहे. याच वैफल्य भावनेवर मग नवतेची पुटे चढवून त्याला नवकला संबोधण्यात काहींची मजल जाते तर काही केवळ नावीन्य म्हणून साहित्यामध्ये काही प्रकार निर्माण करतात. हे प्रस्थापितांविरुद्धचे बंड म्हणजे अक्षरशः परंपराच नष्ट करण्याचा प्रयत्न आहे व अशा तऱ्हेने परंपरा नष्ट होऊ शकत नाहीत. अर्थात निसर्ग न्यायाप्रमाणे 'स्ट्रगल फॉर एक्झिस्टन्स' आणि 'सर्वाइव्हल ऑफ दी फिटेस्ट' या तत्त्वांनुसार या परंपरांच्या घनश्चक्रीमध्ये ज्या सर्व विरोधी शक्तींना तोंड देऊन आपले सामर्थ्य प्रस्थापित करू शकतात अशाच परंपरा टिकून रहातात. परंपरा या व्यासपीठासारख्या आहेत व व्यासपीठे ही जणू व्यावहारिक जीवनातली विद्यापीठेच आहेत. त्यांचा सतत विकास होत रहातो. त्यांमधून निर्माण झालेल्या कलावंतांचे, कार्यकर्त्यांचे प्रयत्न राष्ट्रजीवनाच्या सांस्कृतिक अंगावर आभूषणे चढविण्यासारखे असते. तेव्हा या बंडखोरांतून अशा परंपरा व जीवनविषयक दृष्टीकोन आणि कार्याविषयी निश्चित कल्पना व ठोस कार्यक्रम असणाऱ्या कलावंतांचा वर्ग निर्माण झाला तरच अशा बदलांची शक्यता आहे. टिळक-आगरकर या दोन महान राष्ट्रपुरुषांनी राजकीय आणि शैक्षणिक दृष्टया पुऱ्या महाराष्ट्राला—झोपी गलेल्या सिंहाला—जागे केले व स्वातंत्र्यकालात या सिंहाने आपल्या गर्जनेने दशदिशा दणाणून टाकल्या. संयुक्त महाराष्ट्र निर्माण झाला. त्यानंतर काय ? हाही प्रश्न उभाच रहातो. असे आमूलाग्र बदल घडविणाऱ्या अनेक व्यक्ती, अनेक संघटना, अनेक चळवळी प्रत्येक काळी आणि प्रत्येक समाजात असतात व त्यांचे कार्य शांतपणे आणि अविरतपणे चालूच असते. मात्र आपल्या कर्तृत्वाचा गाजावाजा करून प्रचारात्मक आघाडीवर पुढे येऊन सर्वसामान्य जनतेमध्ये आपल्याबद्दल एक प्रकारचे कुतूहल निर्माण करणे आणि अनाकलनीय अशी कलानिर्मिती करून मग त्यावर नव्याचा शिक्का मारणे हा शिरस्ता मला वाटते अयोग्य आहे.

**कलेची खरी कसोटी**

नवकला, नवकाव्य आणि नवलेखन यामागे विशिष्ट तत्त्वज्ञान आहे, आणि ही एक प्रकारची विशिष्ट पद्धती आहे—आणि कलेच्या इतिहासात जे अनेक बदल झाले, ज्या अनेक उलथापालथी झाल्या त्यांचा विसाव्या शतकातला परिपाक म्हणजे नवकला निर्मिती होय. विसाव्या शतकात यंत्र-मंत्र आणि तंत्र यांमधील प्रगती इतक्या शिगेला पोहोचली की प्रतिकृती अथवा नक्कल ही हीन दर्जाची मानली गेली. हूबेहूब चित्र काढता येणे ही मध्ययुगीन चित्रकारांची कसोटी होती. प्राचीन काळीही तीच कसोटी होती. ग्रीक स्थापत्य, शिल्प आणि चित्रकला तर इतक्या टोकापर्यंत पोहोचली होती की एका राजवाड्याच्या भिंतीवर द्राक्षाचे घोस असलेले पाहून पक्षी उडत येऊन त्यावर चोंची मारल्याचा उल्लेख इतिहासात सापडतो. इतकी कौशल्याची परिसीमा प्राचीन काळातील अजंठा-वेरूळ वा इतर पाश्चिमात्य व मध्ययुगीन कलेमध्ये पहायला मिळते. तर या दोन महायुद्धांच्या कालखंडामध्ये या सर्व प्रमेयांना आणि तत्त्वांना झुगारून देऊन आंतरविश्वातला कलावंतांचा कल्पनाविलास या गोष्टीला प्राधान्य आणि

महत्त्व येऊन त्या दृष्टीने कलावंताने आपल्या भावनाविष्कारा-करिता निर्माण केलेली नवी तत्त्वे, कलाप्रांतातील नवी मूल्ये हीच कलेची खरी कसोटी ठरली आणि त्याही पुढे जाऊन बंडखोर तरुणांचा असा एक क्रांतिकारक वर्ग निर्माण झाला की ज्याने 'मूल्य' या गोष्टीच्या मुळावरच घाव घातला. पूर्वीच्या सर्व परंपरा झुगारून देऊन व्यक्तिनिष्ठ अशी कलासाधने आणि कलासाधनेची अवजारे निर्माण केली. अशा कलावंतांची कलाकृती त्या दृष्टीने क्लिष्ट आणि अगम्य, अतर्क्य अशा थाटात सृजन पावू लागली आणि त्यांचा एक चाहता वर्ग, सहानुभूतीदार वर्ग निर्माण झाला. राष्ट्र-जीवनात आमूलाग्र क्रांती करणारे बदल याही गोष्टीचा अत्यंत गंभीरपणे विचार करणे आवश्यक आहे. क्रांती ही जिच्या प्रमाणात त्या त्या राष्ट्रातील प्रस्थापित घडी, समाजरचना, समाजाची घडी जेव्हा परिस्थितीनुसार समाजाला अनावश्यक ठरते, समाजाच्या सर्वांगीण प्रगतीला बाधक ठरते अथवा एकूण समष्टी-जीवनाच्या प्रगतीच्या आड येऊ लागते तेव्हा, अशा समाजरचनेची चौकट साफ मोडून नवीन तत्त्वप्रणालीवर, नवीन जीवनविषयक दृष्टीकोनावर आणि नव्या आचार-विचार–धर्मावर आधारलेली अशी नवी चौकट निर्माण करण्याची पोटतिडिक असलेले समाज-धुरीण प्रत्येक समाजात निर्माण होत असतात. फ्रान्समध्ये राज्यकर्त्यांच्या पापाचे घडे पूर्ण भरल्यानंतर रूसो-व्हॉल्टेअरसारखे नौजवान व विचारवंत निर्माण झाले आणि क्रांतिकारक तरुणांचा एक वर्ग पुढे आला की ज्याने क्रांतीची मशाल आपल्या देशात सर्वत्र फिरविली आणि आपल्या कार्यात ते यशस्वी झाले. रशियाच्या झार साम्राज्यामध्ये शासनकर्त्यांच्या पापाचे घडे भरले तेव्हा तेथेही क्रांती करणारा तरुण वर्ग निर्माण झाला आणि त्याने स्वतंत्र प्रजासत्ताक अशी समाजपद्धती प्रत्यक्षात आणली–आणि अशा व्यक्तिसमूहांचा प्रयत्न जितका क्रांतीला कारणीभूत ठरतो तितकीच बाह्य परिस्थिती, मग ती राजकीय, सांस्कृतिक, अध्यात्मिक, आर्थिक, शैक्षणिक वगैरे कोणत्याही प्रकारची असो, कारणीभूत ठरते. जगातील मानवजातीचा असा एक इतिहास आहे, ज्यामध्ये निरनिराळ्या राष्ट्रांच्या राष्ट्रीय जीवनांना इतिहास आहे. कालाच्या ओघात मानवी जीवन आपल्या संथ प्रवाहात वहात असून वेगवेगळ्या रंगाचे, धर्माचे, पंथाचे, जाती-उपजाती-जमातींचे अनेक रंगतरंग त्यामधून वहात आहेत. त्यामध्ये होणाऱ्या क्रांत्या हे त्या त्या क्षणी कालाच्या प्रवाहामध्ये निर्माण होणारा खळखळाट आहे. समष्टीजीवनाची परिसीमा गाठलेल्या या आजच्या अणुयुगात व्यक्तिजीवन नावाची चीजच शिल्लक नाही असा एकेकाळी भास होऊ लागतो. समष्टीजीवनाने आजच्या युगात व्यक्तिजीवनाला इतके ग्रासून टाकले आहे की व्यक्तिजीवनाचे स्वातंत्र्य ही गोष्ट नामशेष झाली आहे. त्यामुळे त्याच्या अगदी विरुद्ध आणि दुसऱ्या टोकाची प्रवृत्ती अत्यंत वेगाने उसळी मारून वर येऊ पहात आहे ती म्हणजे व्यक्तिजीवनाच्या अबाधिततेची. यामधूनच नीत्शेचे तत्त्वज्ञान निर्माण झाले व फॅसिझमचा उदय झाला. एक व्यक्ती, त्या व्यक्तीची कुलपरंपरा आणि समष्टी असे नाते निर्माण झाले व एकदा तर दुसऱ्या महायुद्धाच्या धुमश्चक्रीमध्ये एक क्षण असा आला होता की आता या सर्व जगाचे साम्राज्य ही आसुरी फॅसिस्ट शक्तीच स्वाहा करते की काय अशी भीती जाणकारांच्या मनात निर्माण झाली होती व विचारवंतांना काळजीने ग्रासून टाकले होते. पौर्वात्य-पाश्चिमात्य अशा अनेक क्लिष्ट विचित्र परस्पर-विरोधी अशा जीवनविषयक निष्ठेच्या प्रक्रीयेमधून मनत या तत्त्वाने इतर तत्त्वांवर मात करून आपला नंगा नाच सुरू केला. आजसुद्धा सत्तेसाठी सर्वच मानव समाजाला आपल्या अधिकाराखाली, आपल्या अधिपत्याखाली आणण्यासाठी या मनेचे प्रयत्न चालू आहेत व त्यामध्ये संघर्ष आणि सामर्थ्य ही तत्त्वेसुद्धा प्रगल्भतेने झळकू लागली आहेत.

धर्म-अर्थ-काम-मोक्ष यांमधील दरी इतकी विस्तृत झाली आहे की या भारतीय परंपरेच्या चतुःसूत्रीमधील धर्म-मोक्ष ही दोन तत्त्वे आज दिसेनाशी झाली आहेत. अर्थाने धर्मावर मात करून अधर्म वाढवला–अनर्थ वाढवला. अधर्म-अनर्थ यांच्या संयुक्त अनाचारामधून काम हे विरंगुळ्याचे साधन आणि नशा होऊन बसली आणि आजच्या संस्कृतीत तर मानवाने मोक्षालासुद्धा मोक्ष देऊन मोकळा करून सोडला आहे. अशा विचित्र ग्लानीच्या अवस्थेत आज सर्वच समाज असल्यामुळे मानवी समाजाच्या पार्श्वभूमीवर आपल्याला आपण भारतीय कुठे आहोत. निदान महाराष्ट्रीय समाज कुठे आहे असा प्रश्न विचारणे योग्य ठरेल. अशाच ग्लानीच्या अवस्थेत 'संभवामि युगे युगे' प्रत्ययास येते आणि धर्मसंस्थापनासाठी–समाजाच्या धारणेला आवश्यक आणि पोषक अशा तत्त्वांसाठी प्राण वेचणारे क्रांतिकारक निर्माण होतात. विभूतिमत्वाचा प्रश्न सोडल्यास आजच्या बंडखोर तरुणांमध्ये या निर्माण झालेल्या सामाजिक ग्लानीमधून समाजाला बाहेर काढण्याची पात्रता येण्यासाठी या बंडखोर तरुणांना अजून पुष्कळच आणि प्रखर तपश्चर्येची आवश्यकता आहे.

आजची परिस्थिती आणि आजचा बंडखोर तरुण यांचा विचार केला तर पारतंत्र्यकालात राज्यकर्त्यांनी जी एक नोकरशाही त्यांच्या कारभाराला पूरक अशी निर्माण केली होती त्याच नोकरशाहीचे प्रतिबिंब आजच्या समाजजीवनात राजकारण, अर्थ, न्याय, शिक्षण इत्यादि सर्व क्षेत्रात दिसून येते व याच पारंपारिक छत्राखाली आजचा तरुण वाढला असल्यामुळे युगानुयुगे जीवनावर चढलेली त्या समाजपद्धतीची पुटे काढणे ही गोष्ट अत्यंत कठीण व क्वचितच संभवनीय ठरते. संपूर्णतया क्रांतिकारक अशी मनोरचना. बौद्धिक पातळी, वैचारिक पातळी आणि विचार-आचारातील साम्यता या मौलिक गुणांना जर त्याने स्वतःच्या कर्तबगारीवर जोपासना करून त्यानुसार आपल्या सामाजिक जबाबदारीची धुरा शिरावर घेऊन जीवनाची वाटचाल केली तर बंडखोर हा खराखुरा बंडखोर ठरेल आणि त्याच्या कार्याचे भरघोस यश त्याच्या पदरात पडेल. ● ● ●

अनुक्रमणिका

# कशाला भरविता असली प्रदर्शने?



—चित्रकार : व्ही. एस. गुर्जर

बालचित्र विभाग आणि हस्तकला विभाग वगळणे, स्थापत्य विभागासाठी एकही कलाकृती न येणे आणि उरलेल्या विभागांमधील कलाकृती सुमार दर्जाच्या असणे हे यंदाच्या दहाव्या राज्य कला-प्रदर्शनाचे वैशिष्ट्यच म्हणता येईल.

हे कला-प्रदर्शन मुंबईच्या जहांगीर आर्ट गॅलरीमध्ये डिसेंबरात भरविण्यात आले होते. गेल्या तीन वर्षांत हे प्रदर्शन भरलेच नव्हते, त्यामुळे यंदाच्या प्रदर्शनात गेल्या तीन वर्षांच्या गैरहजेरीचा वचपा भरून काढणाऱ्या कलाकृती निश्चितपणे पाहण्यास मिळतील अशा आशेने कलाप्रेमी प्रदर्शन पाहण्यास येत होते आणि घोर निराशा पदरी बांधून परतत होते, असे दुःखाने म्हणावे लागते.

प्रदर्शनात वाखाणण्यासारख्या दोन गोष्टी होत्या. त्या म्हणजे प्रदर्शनाबाबतची माहिती देणारी नावीन्यपूर्ण आणि झोकदार रंगीत माहिती पत्रिका आणि आकर्षक मांडणीबरोबरच उत्कृष्ट प्रकाशयोजना. या दोन्ही योजनांमुळे सकृद्दर्शनी प्रेक्षक भारावून जातो, पण. . .

## मामुली दर्जाच्या शिल्पाकृती

शिल्पकृती विभागात अवघे पाच-सहाच नमुने ठेवले होते, त्यावरून ते निवडक असावेत असा समज झाला आणि त्या कलाकृती पाहिल्यावर मात्र तितकीच निराशा पदरी आली. सर्वच नमुने अगदी मामुली स्वरूपाचे होते. दीड हजारांचे बक्षीस जाहीर केलेली शिल्पकृती तर 'बैल की सहा पायाचे घुबड ?' अशा एखाद्या विचित्र प्राण्याची होती. विद्या गुजराल या पंजाबी महिलेने तयार केलेल्या 'दाय कन्यका' या 'हेडस्टडी' म्हणता येईल अशा शिल्पाला दुसरे बक्षीस मिळाले आहे. प्रशिक्षित मराठी शिल्पकार अभावानेच तळपण्याच्या मार्गावर आहेत असे हे प्रदर्शन पाहून वाटले.

चित्रविभागात आचार्य-प्राचार्यांनी तयार केलेली तैलचित्रे मांडलेली असल्याने फार उत्सुकतेने प्रेक्षकाने तिकडे वळावे नि घोर निराशा पदरी पडावी असाच प्रकार घडला. या चित्रांना 'भटारखान्यातील धुरकटलेल्या नि खरवडलेल्या भिंती' म्हणता येईल असा प्रकार होता. ही चित्रे पाहून नव्या पिढीने त्यातून काय स्फूर्ती घ्यावी हा प्रश्नच होता. काही चित्रे हिप्नॉटिस्ट-मांत्रिकांच्या स्टुडिओत शोभतील अशी होती तर काही चित्रे कॅन्व्हासवर रंगीबेरंगी बेटोळी टाकून किंवा रंगाने लडबडलेले अमूड मारून केली असावीत असे दिसत होते. या 'क्रिएटिव्ह कलाकृती' म्हणजे नवोदित मंडळींनी न पेलणारी झेप घेऊन तयार केलेल्या कलाकृती वाटत होत्या. त्यामुळे कला-शिक्षणाचे आणि कलेचेही हसे होत होते. आधीच 'मॉडर्न आर्ट' हा थट्टेचा विषय बनलेला आहे, त्याला पुष्टी मिळावी असेच या कलाकृतींवरून म्हणावे लागते.

## कुठे गेला तो कस !

वास्तविक आज चित्रनिर्मिती विपुल प्रमाणात होत आहे. अलिकडे बरेच 'वन मॅन शो' भरत असतात हे त्याचेच द्योतक आहे, पण या कलाकृती पाहिल्या म्हणजे कलेचा कस कमीकमी होत आहे अशी भीती वाटू लागते. आजच्या नव्या पिढीत कलाशिक्षणाच्या दृष्टीने आवश्यक अशी निष्ठा, तपस्या, श्रद्धा, तादात्म्य इत्यादि गुणांचा अभावच आढळतो. त्यातच आजचे कला-शिक्षक विद्यार्थ्यांचा पायाशुद्ध अभ्यास पूर्ण होण्यापूर्वीच त्यांना वाजवीपेक्षा अधिक निर्मितीस्वातंत्र्य देतात. त्यातच शिक्षकांच्या फसलेल्या प्रयोगांचे आदर्श त्यांच्यापुढे ठेवतात. त्यामुळे तरुण पिढीला 'कला प्रशिक्षण' म्हणजे पोरखेळ वाटतो आणि त्याचाच परिपाक म्हणजे आजचे बरेचसे 'वन मॅन शो' !

प्रदर्शनातील लॅण्डस्केप्सही मामुली स्वरूपाचीच होती. त्यात काहीच आकर्षण नव्हते. रंगीत कागद कापून नि चिकटवून केलेली 'कोलोज लॅण्डस्केप्स' तर हायस्कुलातील विद्यार्थ्यांच्या हस्तकला प्रदर्शनात कदाचित शोभतील अशा स्वरूपाची होती. अभिजात म्हणून समजल्या जाणाऱ्या कला-प्रदर्शनासाठी ही चित्र कशी स्वीकारली असाच प्रश्न पडतो. 'पेंटिंग्ज विदाऊट पेंट्स्' अशी चित्रे महाराष्ट्राच्या लौकिकाला खासच भूषणावह नव्हती. प्रदर्शनात काही व्यक्तीचित्रे होती तीही सदोष रेखाटनामुळे कच्ची वाटत होती.

## गचाळ पोर्ट्रेचर विभाग

या प्रदर्शनात 'पोर्ट्रेचर' या महत्त्वाच्या कला प्रकाराकडे संपूर्ण दुर्लक्ष केलेले दिसले. या विभागातील कित्येक चित्रे तर केवळ नकला होत्या हे फार उशीराने लक्षात आले, यावरून प्रदर्शनाची निवड नि निर्णय समिती पुरेशी सावध नव्हती असे म्हणावे लागते.

'ॲप्लाईड आर्ट' हा विभाग मात्र छोटासा पण दर्जेदार वाटला. या विभागात स्पोर्ट्सबरोबरच इलस्ट्रेशन्स, व्यंगचित्रे इत्यादि कलाप्रकारांनाही उत्तेजनार्थ बक्षिसे देण्याचा उपक्रम ठेवला तर आज त्या विभागात दिसणारा एकांगीपणा नाहीसा होईल आणि त्या विभागात अधिक रंजकता निर्माण होईल. ●●●








—सोपानदेव चौधरी

## काव्य मिच्यां मंडळीचे कविसम्मेलन

चाळल्यो सपाटुनि चर्चा
जो तो ये व्यासपिठावर
"आजची मराठी कविता
आहे कां प्रगति पथावर ?"

जवळजवळ सव्वीस वर्षापूर्वीचा एक प्रसंग, त्यावेळी जिकडे तिकडे काव्य-चर्चांना ऊत आला होता. काव्याशी ज्याचा काही संवंध नाही त्याला देखील काव्य चर्चेचा हव्यास लागला होता. व्यास-पीठाचे हव्यासपीठ झाले होते. जास्तीत जास्ती रटाळ कोण वोलतो, याची जणू अहमहमिका लागली होती. एखाद्या सरस कवितेला रसहीनता कशी आणावी याचे जणु ते प्रात्यक्षिकच होते. "या वेळी ये माझ्या रमणा !" कविवर्य तांव्यांची किती सुंदर कविता ! त्या कवितेवर भाष्य कर-ताना एक वक्ता असे काही भकला की विचारूच नका. त्याने इतके जेरीस आणले की "या वेळी ये माझ्या मरणा" असेच कुणालाही वाटावे. केशवसुतांची कविता मुळातच अवघड आणि गहन, ह्या कविते-तील विवेकवल्लीची लावणी अन् वोध-बोधाची लेणी खोलून दाखवायची ते वाजूलाच राहिले, सुलभतेचा मार्ग सोडून तो वक्ता कठीणीकरणाकडे इतका वळला की फक्त दुर्लभताच पदरी पडली. कवीला असे सांगायचे होते (जे कवीच्या मनात कधीही आले नसेल ते) असे म्हणून आपले विवेकी घोडेच तो पुढे दामटीत होता. तेच ते. या चर्वितचर्वणाने काव्य-चर्चेत फक्त चोथा उरला होता. काव्य चर्चा मंडळाचे असे ते कार्यक्रम होते.

आमच्या खासगी बैठकीत मी, राजा वढे आणि पु. ल. देशपांडे सहज गप्पागोष्टी करीत वसलो होतो. काव्यचर्चा मंडळावर चर्चा करीत असताना राजा वढे यांना काव्यमिच्यां मंडळाची कल्पना सुचली. आम्ही दोघांनी अगदी समेवर सामील झाल्यागत साथ दिली. एक दोन दिवसांनी पु. ल. आणि राजाभाऊ यांनी ही काव्य-मिच्यां मंडळाची कल्पना वा. सी. मर्ढेकरांना सांगितली (त्यावेळी ते मुंबई रेडिओचे असिस्टंट स्टेशन डायरेक्टर होते) त्यांनाही ती कल्पना फार आवडली आणि राज वढे यांना पंधरा मिनिटी फीचर लिहावयास सांगितले. राजाभाऊंनी तीन चार दिव-सातच ते फीचर फटकारले आणि मर्ढे-करांच्या हाती दिले. या फीचरमधील कलावंत स्वतः मी, पु. ल. देशपांडे आणि राजा वढे असे होतो. फीचरमध्ये सर्वच काल्पनिक. एका अज्ञात कवीच्या पुण्यतिथी-निमित्त आयोजित केलेला तो कवि-संमे-लनाचा कार्यक्रम होता. प्रथम पु. ल. देशपांडे यांनी आचार्य अत्रे यांच्या आवा-जात अज्ञात कवि कुंभज, यांच्या पुण्यतिथी-निमित्त हे कवि संमेलन कां भरत आहे यासंवंधी भाषण केले. नंतर राजा वढे यांनी कवींचा परिचय करून दिला आणि सोपानदेव चौधरी यांनी त्या त्या कवींच्या आवाजाची हुवेहूव नक्कल करीत कविता म्हटल्या.

पु. ल. देशपांडे म्हणाले,

"रसिका व रसिकहो ! काव्य मिच्यां मंडळाची स्थापना झाल्यानंतर आपली ही म्हटली तर पहिली, म्हटली तर दुसरी सभा भरत आहे. पहिली अशा करिता की रीतसर नोटीस देऊनही गणसंख्येच्या अभावी पहिली सभा पुढे ढकलावी लागली. तेव्हां आजच्या सभेला 'ढकलसभा' म्हण-णेच जास्त शोभेल (हंशा) आणि क्रम-वारीने दिला तर दुसरी सभा म्हणता येईल. परंतु मुख्य मुद्दा असा की, आळीपाळीने अध्यक्ष होण्याच्या आपल्या शिरस्त्याप्रमाणे माझा अधिकार नाही आणि ओहेही. पहिले अध्यक्ष रावसाहेव चिकटे यांनी उदार हृदयाने आपली जागा सोडल्यामुळे काव्य मिच्यां मंडळाने या तिखट्यांना म्हणजे मला अध्यक्ष होण्याचा मान दिला. असो !

आजची सभा अगदी अनौपचारिक स्वरू-पाची आहे. किंवा तिला स्वरूपच नाही असे म्हणा हवे तर; परंतु ती भरविण्याचे कारण म्हणजे एका अज्ञात कविरायाचे पंचतत्वाप्रत गमन हे होय. ('अरेरे' असे उद्गार) हळहळण्याचे कारण नाही (हंशा) ही शोकसभा नसून आनंदसभा आहे असे मी म्हणतो. जो गृहस्थ जिवंतपणी अज्ञात होता, तो मरणानंतर ज्ञात व्हावा ही आनंदाची गोष्ट नव्हे का ? मरणाने त्याला मोठेपण मिळवून दिले आहे. (टाळ्या) म्हटलेच आहे की "मोठेपणाचा मार्ग मरणाच्या मैदानातून जातो." तेव्हां त्याला मोठेपणा मिळाला असताना आपण हळहळणे आपल्या संकुचित मनाचे द्योतक आहे. (हिअर, हिअर) तो आपल्यातून गला. वरे झाले. तो आपल्या मरणाने मेला. उत्कृष्ट झाले. तो होता तेव्हाही नव्हत्यासारखाच होता. त्याने स्वतःचे होत्याचे नव्हते करून आपले अस्तित्व झाकून टाकले होते. जोपर्यंत त्याचे जवळ मरणासारखे काही नव्हते तोपर्यंत तो जिवंत होता. परंतु जगण्यासारखे मिळ-ताच त्याने 'मरणाची मौन' लुटली.

(अहाहा, अहाहा) सारांश तो नव्हता आणि नंतर नाहीसा झाला त्याबद्दल शोक करणे म्हणजे त्याच्या अस्तित्वाबद्दल संशय घेणंच होय. तो मेला म्हणूनच आज जिवंत आहे. जन्मापूर्वीच त्याच्या आई बापाचे देहावसान झाले होते; असे संशोधक म्हणतात. एका मासिकात आलेल्या त्यांच्या निराकार फोटोवरूनच काळ्या डागासारखे दिसणारे एन्लार्जमेंट आम्ही तयार करून घेतले आहे. ते समोरच ठेवले आहे (सर्व नमस्कार करतात) सभाजनांनी त्यांच्या प्रज्ञाचक्षूंनी पाहिल्यास त्यांचे स्वरूप दिसू शकेल. असो. या शुभ प्रसंगी त्यांचे गुणगान दूरदृष्टीने व दूरध्वनीने गावयास काही ख्यातनाम कवि मंडळी उपस्थित झाली आहे. हे सर्व कवी अज्ञात दिवंगत कवीला काव्य श्रद्धांजली वाहतील. प्रत्येक कवीचा काव्यमय परिचय कवि राजा बढे करून देतील. कविता लिहिणे ज्यांचा धर्म आहे (पाणपोई आहे) असे राजकवी–यशवंत प्रथम आपली कविता गातील.

परिचय— "जो रोज कवि तो आज कवी
आदर्श कवींचा राजकवि
गुणवंत कवि, यशवंत कवि
अपुली कविता ही आयकवी."

कविता–येइ भाई येथ पाही, घातली ही पाणपोई.

* * *

आता कविवर्य गिरीश आपली कविता गाऊन दाखवतील.

परिचय :–"मानस मेघातील झिरपणी
तीच जाहली कांचनगंगा
भगिरथ यत्ने येत खालती
गिरी सोडुनी सागर संगा"

कविता :–"भलरी भलरिदादा, भलगडी दादा–"

* * *

आता जुने जाणिते पहिले काव्यगायक आनंदराव टेकाडे आपल्या खड्या आवाजात राष्ट्रीय कविता गातील.

परिचय:—

रे ऐक ऐक रसिका, राष्ट्रीय काव्यकेका
आनंदकंद ऐसा, कविराज आ. कृ. टेकाडे्यात ताक पाणी, घुसळोनि काढि लोणी
द्या कान आयका ते, या आद्य गायकाते !

कविता-"मृत जीवनी, कसली कला ऽऽऽ"

* *

आता आपल्या शिशुगीतांनी ख्यातनाम असलेले कवि मायदेव आपली इवलीशी कविता गातील

परिचय :—

झटकताच ते फाऊंटन पेन
पाडित कविता इवली छान
लांबलचक प्रस्ताव मजेचा
काव्य पसारा दो थेंबाचा !

कविता–आम्ही होउं घागऱ्या ग, नाचू
छुम छुम छुम छुम्–

* *

तदनंतर कवि सोपानदेव चौधरी कविता गाऊन दाखवितील.

परिचय :–नाशिकचा नरपुंगव
कवि गायक चौधरीच सोपान–
देव दयेने रसिका
ऐकाया लाभले तुम्हा कान
घेई न 'जोगवा' जो
देई इतरास काव्य मल्हारी
सोपानदेव कविची
जनहो ! मी काय सांगु वल्हारी !

कविता–माझ्या मोऱ्याची काय सांगू वल्हारी—

(अर्थात् माझ्या कवितेची ही मीच नक्कल केली)

* * *

येथे ख्यातनाम कवयित्री सौ. संजीवनी मराठे याही उपस्थित झाल्या आहेत. आपल्या मधुर आवाजात ज्ञानेश्वर माऊलीच्या भावबोलात आपली कविता गातील.

ऐका मराठेचे बोलु कवतिके
अमृतातेही पैजा जिंके
सुस्पष्ट केला अनुनासिकें
इयें काव्यातला ध्वनि
काव्य रसाची संजीवनी
रसिका लाभे प्रतिदिनी
मंजुल मधुरा गायनीं
नाद वैभव ओसंडे

कविता :–"घातली उडी संसारी कशि येऊं गडे माघारी."

*

आता शेवटी कवि राजा बढे यांचा म्हणजे माझा परिचय मीच करून देत आहे (त्यावेळी राजा बढे हे डोक्याला टोपी घालत असत)

टोपी किंचित उंच नीट कलती
बाजूस डोकावित
खासे धोतर पायघोळ अगदी
टाचेवरी लोळत
ओठांनी रसरंग फेकित सदा
वा मंगलाचे सडे
आहे कोण म्हणूनि काय पुसता
हा तोच राजा बढे !

कविता :–जल बलयि तुझे प्रतिबिंब हले.

*

कार्यक्रम संपला. हा कार्यक्रम ध्वनिमुद्रित करताना स्वत: मर्ढेकर जातीने हजर होते. त्यात रस घेऊन ध्वनिमुद्रणाकडे लक्ष देत होते. पु. ल. देशपांडे त्यावेळी एक कॉलेजचे विद्यार्थी, उदयोन्मुख साहित्यिक होते. त्यांनी केलेले उत्कृष्ट भाषण, रामटेक अन् बंगला या गंगाजमनी पानाच्या सुगंधात कविवर्य राजा बढे यांनी करून दिलेले दर्जेदार परिचय आणि अस्सलाबरहुकूम वठलेल्या माझ्या कवितांच्या नकला असा हा कार्यक्रम ऐकून सर्वच खूष झाले होते. वेटिंग रूममध्ये बसलेल्या ज्या लोकांनी तो कार्यक्रम (लॉऊड स्पीकरद्वारे) ऐकला ते विचारू लागले "आज यशवंत आले आहेत का ? गिरीश आले आहेत का ? मायदेव आले आहेत का ?" असो. ह्याच महिन्यात स्टेशन डायरेक्टर मर्ढेकर यांची दिल्लीला बदली झाली. आणि मग कुठे माशी शिंकली कुणास ठाऊक हा ध्वनिमुद्रित कार्यक्रम ध्वनिक्षेपित होऊ शकला नाही. झाला नाही. या कार्यक्रमातील ह्या अज्ञात कवीचे जसे व्हावे तसेच या कार्यक्रमाचे (फीचरचे) झाले. या लेखाच्या निमित्ताने त्याने मरणाची मौज लुटली, योग ! दुसरे काय ?

* * *

(संगीत विशेषांकातील क्षुद्रघंटिका : **संगीतज्ञ प्रा. न. र. फाटक** )

## ‘ साहित्य पुरुषोत्तम ’

# पुरुषोत्तम भास्कर भावे

एखाद्या सेनापतीची वा वलदंड मल्लाची शरीरयष्टी, द्रष्ट्याची (आरपार पाहू शकणारी) भेदक दृष्टी, प्रसन्न हास्य आणि तत्त्वचिंतकाचे गांभीर्य, क्रांतिकारकाची प्रखर ध्येयनिष्ठा, एखाद्या सतीची न वाकणारी व कुठलीही तडजोड–तत्त्वच्युतीची किंमत देऊन–नाकारणारी श्रद्धा, कवीचे भावकोमल मन, सत्यनिष्ठेचे ‘तपस्वी’ मन, आगीतून होरपळून निघाल्यानंतरही सुगंधाची बरसात करणारे कमल-कोमल मन आणि अन्यायाविरुद्ध उभ ठाकताना “वज्रालाही भेदू” ऐसे विष्णुदासी मन, जीवनातले सौंदर्य आणि जीवनातली करुणता, जीवनातले चिरंतन आणि जीवनातले सामान्य व क्षणिक ह्या साऱ्यांचे हंसक्षीर न्यायाने पृथःकरण करू शकणारे चिकित्सक मन जे दिसले-भासले व भावले ते निःसंकोच व निर्भय मनाने मांडण्याची तत्त्वकठोर वृत्ती, विचारांच्या पाठीशी कृतीचे अधिष्ठान असावे लागते हे जाणून घेऊन ‘कृती’चा धर्म आचरणारे कार्यशील मन, पुरुषोत्तमाचे नाव धारण करून, पुरुषोत्तमांचा वेध घेत फिरणारे, भव्योदात्त स्वप्नात रमणारे, त्या स्वप्नांच्या सांगतेत जीवनाची कृतार्थता मानणारे ‘मीरे’चे मन श्रीयुत पुरुषोत्तम भास्कर भावे यांना लाभले आहे. माणूस एकारलेला कधी असत नाही. कुठलाही कलावंत-लेखक हा तर तसा असत नाही. एकाच व्यक्तित्वात अनेक व्यक्तित्वे आणि एकाच स्वप्नात अनेकरंगी, असंख्य स्वप्ने दडलेली असतात. पु. भा. भावे यांच्या व्यक्तित्वात अशाच अनेक व्यक्तींचा व अनेक स्वप्नांचा सुरेख संगम झालेला आहे. भावे यांच्या तरुण वयात भावे यांना संस्कार लाभले ते सावरकरांचे व सावरकरवादाचे. त्यामुळे तरुण भावे शिक्षणाबरोबरच ‘राजकारण’ खेळू लागले आणि परीक्षेच्या ‘पेपरा’सोबत नागपुरातल्या ‘सावधान’ नामक पेपरातही ते मर्मभेदक, काव्यात्म, तरुण मनाची उमेद आणि उन्मेष व्यक्त करणारे लेखन करू लागले. प्रत्यक्ष राजकारणाचा धर्मही आचरू लागले. त्या काळात राजकारण हा ‘सोयी’चा वा ‘सत्तेचा’ धंदा नव्हता. फासावर्चे रक्त ठिबकताना दिसत होते अंदमानच्या अंधेरीतल्या किंकाळ्या ऐकू येऊ शकत होत्या. फटके खाणे हा ‘इतिहास’ झाला नव्हता. त्याकाळी निष्ठा मोलाच्या असत–मानल्या जात. भावे यांनी त्या निष्ठेने आदेश-सावधान चालविले आणि १९४८ सालच्या गांधीवधोत्तर काळात त्या निष्ठांपायी प्रचंड किंमतही दिली. पत्रकार भावे डोंबिवलीला आले आणि नंतरच्या काळात महाराष्ट्राला प्रामुख्याने एक ललित लेखक मिळाला. ‘आदेश-सावधान’कार आजही कायम आहेत. १९४९ नंतर भाव्यांतला कथाकार, कादंबरीकार, नाटककार, ललित निबंधकार–वक्ता हा महाराष्ट्राला अधिक प्रमाणात परिचित झाला. भावे ह्यांच्या व्यक्तित्वाची सारी वैशिष्ट्ये त्यांच्या लेखनातही आपल्याला पहायला मिळतात. कारण तेथे जीवन व साहित्य यांचा अन्योन्यसंबंध आहे. कथाकार भावे यांनी ‘मराठी कथे’ला नुसते समृद्ध नव्हे तर श्रीमंत व सुंदर केले आहे. भाव्यांच्या शैलीतच एक प्रकारचा जोम, तेजस्विता, समर्थता, काव्यात्म सौंदर्य, नव्या शब्दांची निर्मिती करण्याची सृजनशक्ति. महापूर आलेल्या एखाद्या नदीच्या पाण्याचे प्रवाहित्व, गायिकेची लय आणि नर्तिकेचा ताल-तोल आहे. ती शैली केवळ “शाब्दिक” नाही. तिच्या पाठीशी उभे आहे एक समर्थ, अनुभवसंपन्न, सुसंस्कृत आणि सत्त्व (तत्त्व) शील मन ! भावे ‘शैली’ टिकून आहे. मोहवीत आहे. अजूनही ‘जनता कौल’ मिळतो तो कथाकार भावे यांना ! त्यांनी मराठीला शेकडो चांगल्या कथा दिल्या आहेत. बावीस कथासंग्रह ही त्या क्षेत्रातली त्यांची कमाई ! अकुलीना, वर्षाव, अंतराळ ह्या कादंबऱ्यांची पारायणे मी अनेकदा केली आहेत–तरीही त्यातले ताजेपण, त्यातला सुगंध व त्यातल्या व्यथा-वेदना कायम आहेत. त्यांची कथावस्तूच नव्हे तर अवघे लेखन हीच एक अवीट मोहिनी आहे. ह्या सर्वच






लेखनात विशाल जीवनानुभव आहे. व्यापक सहानुभूती आहे. मानवी मनोव्यापारातल्या स्थूलाचे आणि सूक्ष्माचे सुरेख (व देखणेही) दर्शन आहे. ह्यात ‘प्रकृती’ची कथा आहे तशीच ‘विकृती’चीही ! सतीची आहे तशीच सामान्य स्त्रीचीही आहे. “पटले नाही ते केले नाही. पटले नाही ते कधी लिहिले नाही” असे सांगणारी ताठ कण्याची माणसे आजच्या ‘सोदा-धर्मी’ जगात कमीच पहायला मिळतात. ‘तडजोड’, ‘सोडून द्या’ हा आजचा युगधर्म ! अशा काळात भावे यांनी आपल्या साऱ्या निष्ठा जपल्या, मोल देऊन जपल्या. आणि वरेचसे ‘अमोलिक’ मराठी साहित्याला दिले आहे. त्यांच्या त्या ‘अमोलिका’चा गौरव म्हणूनच की काय मराठी नाट्य परिषदेने यंदा त्यांना नाट्य लेखनाचे सुवर्ण पदक देऊन भूषविले आहे. पत्रकार भाव्यांचा आज नाटककार भावे म्हणून गौरव होत आहे. पण हे सारे व्यक्तित्व अखेर एकसंध आहे. एकात्म आहे. एकनिष्ठ आहे. मेणाहून मऊ आणि वज्राहूनही कठोर असे ‘विष्णुदासी’ व्यक्तित्व लाभलेल्या भाव्यांचे अभिनंदन करतो.









## सर्वव्यापी, सर्वस्पर्शी. 'जीवन निष्ठा'

# भाऊसाहेब खांडेकर

श्री. भाऊसाहेब खांडेकर यांची साहित्य अकादमीवर फेलो म्हणून नियुक्ती झाल्याचे वृत्त वाचून कुणाही मराठी माणसाला आनंद व अभिमानच वाटेल. 'साहित्य अकादमी' ही एक अखिल भारतीय संस्था आहे. तेथे बहुभाषिक साहित्ययंत्रणा अभिप्रेत असते. अशा मान्यवर संस्थचे सदस्यत्व मराठीतील एका सृजनशील, सत्प्रवृत्त आणि व्यापक सहानुभाव असलेल्या लेखकाकडे चालत आले आहे ही गोष्ट भाग्याची ! श्री. भाऊसाहेब खांडेकर यांचे मी व्यक्तिशः व 'दीपावली'च्या वतीने मनःपूर्वक अभिनंदन करतो. फडके-खांडेकर युग संपल्याची ग्वाही अधुनमधून कुणी तरी टीकाकार देत असतो—परंतु ते युग नेमके कुठे संपले आहे ते मात्र शोधून सापडत नाही—कारण वाचनालयात आजही 'फडके-खांडेकर' युग चालू आहे याचा प्रत्यय येतो. महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात खांडेकर हे नाव पोहचले आहे आणि श्रद्धा केंद्र म्हणून ते स्थिरावलेही आहे. खांडेकरांची दृष्टी आणि खांडेकरांचे हातही जिथवर पोहचू शकले नसतील अशा खेड्यापाड्यापर्यंत त्यांचे शब्दरूप हात पोहचले आहेत. आणि अनेक माध्यमातून ते पोहचले आहेत. लघुकथा, कादंबऱ्या, लघुनिबंध, भाषणे—टीकाप्रबंधात्मक पुस्तके, चित्रपट, चरित्रे, अनुवाद, प्रस्तावनारूप लेखन आणि संपादित साहित्य आदि विविध प्रकारांनी खांडेकर मराठी वाचनालयात आणि पर्यायाने मराठी मनात शिरले. हृदयाची हाक ही त्यांची पहिली कादंबरी १९३० साली प्रसिद्ध झाली तर नवमल्लिका हा कथासंग्रह १९२९ साली प्रसिद्ध झाला. त्यांनी कविता व विनोदी लेखन केले. नाटकेही लिहून पाहिली. साहित्यविषयक मासिकांचे (ज्योत्स्ना) संपादनही केले. ही सारी तपश्चर्या गेल्या पन्नास पंचावन्न वर्षांची आहे. (रमणी रत्न नाटक १९१४ साली लिहिले—अप्रकाशित) साहित्य क्षेत्रातले अनेक लहान मोठे मानसन्मान त्यांना मिळाले. ते पद्मभूषणही झाले. आणि आता ते साहित्य अकादमीचे फेलो झाले आहेत. साहित्याच्या क्षेत्रात अनेक नवे जुने वाद झाले—त्यात फडके—खांडेकर यांचा कला-जीवन वादही एक होता ही गोष्ट जाणकार रसिकांच्या स्मरणात असेल. आजचे वाद वेगळे आहेत. सारीच मूल्ये ढवळून निघत आहेत. अशा काळी हे वाद जुने (व जुनाटही) वाटतील. पण त्या त्या वादांनी एक काळ रंगला-गाजला होता. खांडेकरांची प्रकृति त्यांना साथ देत नाही. दृष्टी असहकार करते. पण खांडेकरी रसिकता साक्षेप आणि साहित्य व जीवन-निष्ठा त्यांच्यावर सतत मात करीत आली आहे. आज बहात्तराव्या वर्षी त्यांची व्याख्याने, त्यांचे आत्मचरित्रादि लेखन हे उद्योग चालूच आहेत. खांडेकरांनी वृद्धत्वी 'निज शैशव' जपले आहे कारण त्यांचा बाणा (व पिंड) मूलतः कवीचा आहे. अशा ह्या काव्यात्म वृत्तीच्या वृद्ध तरुणाला साहित्य अकादमीच्या चिरनव कार्यी फेलोशिप मिळाली हा सुयोगच नव्हे काय?

## निष्ठावन्त 'नाट्याभ्यासी

# श्री. ना. बनहट्टी

रायगडाला जेव्हां जाग येते, रथचक्र, ययाती, स्वामीनतर यंदा साहित्य अकादमीचे पारितोषिक एका निष्ठावंत नाट्याभ्यासी माणसाला मिळाले आहे. ह्या माणसाचे नाव आहे श्री. **श्री. ना. बनहट्टी**. श्री. ना. बनहट्टी यांना साहित्य अकादमीने ज्या ग्रंथाबद्दल पारितोषिक देऊन गौरविले आहे त्या ग्रंथाचे नाव आहे "**नाट्याचार्य देवल**" वस्तुतः हा ग्रंथ ऑक्टोबर १९६७ ध्ये प्रसिद्ध झाला. परंतु पारितोषिक मात्र जाहीर झाले आहे १९७० मध्ये ! परंतु साहित्य अकादमीची पारितोषिक-कक्षा तीन वर्षांची आहे, असू शकते हे गृहित धरले तर हा विलंब नव्हे. 'नाट्याचार्य देवल' प्रसिद्ध होण्यापूर्वी त्यांचे अकरा ग्रंथ प्रकाशित झालेले असून सहा 'संपादित' ग्रंथांचीही त्यात भर घालावी लागेल. ह्या ग्रंथांपैकी मराठी रंगभूमीचा इतिहास खंड १ ला, मराठी नाट्यकला आणि नाट्य वाङमय, नाट्य आणि रंगभूमी, चिंतन आणि चर्चा, वाङमयविमर्श, टिळक आणि आगरकर, ज्ञानोपासना आणि भारतीयांचे कर्तव्य आदि ग्रंथांना मराठी नाट्य-टीका वाङमयात मानाचे स्थान लाभले आहे. 'नाट्य' हा त्यांच्या निष्ठेचा व अभ्यासाचा खास विषय आहे. त्या विषयाच्या अनुषंगाने त्यांनी ग्रंथ रचनेबरोबरच स्फुट लेखनही केले आहे. '**नाट्याचार्य देवल**' हा ग्रंथ केवळ चरित्रात्मक ग्रंथ नाही. देवलांची नाट्य-संपदा त्यांनी चर्चिली आहे—मार्मिकतेने, रसज्ञतेने आणि सहानुभावाने !! 'शारदा' नाटक सोडले तर देवलांची इतर सर्व नाटके अन्य भारतीय वा परकीय भाषांतून रूपांतरित वा भाषांतरित केलेली आहेत. त्या दृष्टीने बनहट्टींचे दायित्व मोठे होते. त्यांनी त्या त्या मूळ नाट्यकृती व देवलांचे संस्करण यांचा तौलनिक अभ्यास केलेला आहे. दुर्गा, झुंजारराव, संशयकल्लोळ ही परकीय भाषांतून स्वीकारलेली तर शापसंभ्रम, मृच्छकटिक, कादंबरी, विक्रमोर्वशीय ही भारतीय मूळ असलेली देवलांची नाटके बनहट्टींनी ह्या पुस्तकात साक्षेपाने चर्चिली आहेत. 'शारदा' नाटक हे केवळ जरठ कुमारी विवाहावरचे नाटक नाही तर निषिद्ध असा कन्याविक्रयही देवल यांना अभिप्रेत होता आणि ह्या संदर्भात त्या नाटकातल्या नांदी-भरत वाक्याची सुरेख व मार्मिक साक्ष बनहट्टींनी काढली आहे. आणि हे सारे विवेचनच मौलिक व मूलगामी झाले आहे. अशा ह्या ग्रंथाचा व त्यासाठी केल्या गेलेल्या डोळस प्रयत्नांची दखल दिल्लीकर 'अकादमी'ने घेऊन पर्यायाने बनहट्टींबरोबर 'महाराष्ट्र गौरव' केला आहे. अशी साधक व निष्ठावंत माणसेच कुठल्याही साहित्य-कलेच्या क्षेत्राला काही 'मौलिक' देऊ शकतात. व्यासपीठ आणि टाळ्यांचा मोह टाळून अशी साधना करणारे अनेक साधक ह्या मराठी मातीने ह्या देशाला साहित्य—संस्कृति—कलेला दिले आहेत. बनहट्टी ही 'पब्लिक' फिगर नाही. पण 'पब्लिक'ने मात्र अशा साधकांच्या प्रयत्नांची दखल घ्यायलाच हवी. दाद द्यायलाच हवी. 'दीपावली' संस्कृति-कला-साहित्य संगमावरून बनहट्टींच्या साधनेला अभिवादन करते—

—आदित्य





अनुक्रमणिका

(पृष्ठ १० वरून – बर्ट्रांण्ड रसेल)

रसेलने मात्र पराभव मान्य करण्याचे नाकारले. परंतु मार्ग सुचेना. अशा परिस्थितीत जवळ-जवळ वर्ष दीड वर्ष गेले. व अकस्मात रसेलला एक नवीन कल्पना सुचली. ही कल्पना तशी काही नवीन नव्हती. फ्रेगेच्या तत्त्वज्ञानात त्या कल्पनेचे मूळ होते. परंतु त्या तत्त्वज्ञानापेक्षा ती भिन्न होती. या नवीन कल्पनेला रसेलने Theory of descriptions असे नाव दिले आहे. वास्तविक जो मुद्दा रसेलने या कल्पनेच्या आधारे उपस्थित केला होता तो कांटने आपल्या Critique of Pure Reason या ग्रंथात Aesthetic या भागात उपस्थित केला होता. तो मुद्दा असा : ७+५=१२ आणि ७+५=७+५ ही दोन समीकरणे वस्तुतः एकच आहेत. वस्तुतः तर खरेच; परंतु खरोखरीच ती तशी आहेत काय ? पहिल्या समीकरणात आपल्याला नवीन बोध होतो. परंतु दुसऱ्या समीकरणात तसा बोध होत नाही. ७+५=७+५ अशा तऱ्हेचा पुनरुच्चार करण्यात अर्थ काय ? आणि गणितशास्त्र म्हणजे केवळ पुनरुच्चाराचे समीकरण असा अर्थ घेतला, तर गणितशास्त्राला शास्त्र तरी कां म्हणावे ? तेव्हां याचा अर्थ असा की जेव्हां आपण ७+५=१२ असे म्हणतो तेव्हां १२ या कल्पनेत ७+५ यापेक्षा काही तरी अधिक असते. केवळ पुनरुच्चार नसतो. पण ते अधिक असते ते नेमके काय असते ? कांटने या प्रश्नाचे जे उत्तर दिले आहे ते मुळीच समाधानकारक नाही हे तर खरेच; परंतु कांटनंतर आलेल्यांनासुद्धा या प्रश्नाचे नीट उत्तर देता आले नाही. कांटने या प्रश्नाचे उत्तर देताना गणितशास्त्र व तर्कशास्त्र यांची सांगड घालण्याचा प्रयत्न केला नाही. रसेलने कांटच्या पुढे जाऊन या प्रश्नांचे उत्तर देण्याचा प्रयत्न वरील कल्पनेच्या आधारे केला, इतकेच नव्हे तर त्याचे उत्तर केवळ गणितशास्त्र व तर्कशास्त्र या दोन शास्त्रांच्या अभिन्नतेमुळे होऊ शकेल असा दावा मांडला.

## स्वतःचीच कल्पना चूक ठरविली

प्रथमतः या कल्पनेचा उपन्यास रसेलने तत्त्वज्ञान विषयास वाहिलेल्या Mind या त्रैमासिकात १९०५ साली On Denoting हा लेख लिहून केला. हा लेख इतका नावीन्यपूर्ण होता की त्यावेळचे Mind चे संपादक G. F. Stout जे स्वतः एक नामांकित तत्वज्ञ होते, त्यांना या लेखाचा आशय कळेना. त्यांनी रसेलला हा लेख बदलून निराळ्या तऱ्हेने लिहायला सांगितले; परंतु रसेलने ते जुमानले नाही. अखेरीस तो लेख जशाचा तसा प्रसिद्ध झाला व तो क्रांतिकारक ठरला. जरी त्या लेखाचा आशय Theory of Descriptions असा होता तरी त्याचा मतितार्थ केवळ वर्णनविषयक नसून एका विशिष्ट मुद्द्यापुरता होता. तो मुद्दा असा : गणितशास्त्राचा मुख्य पाया म्हणजे अंक Number या कल्पनेचा. आपण वर पाहिले आहे की रसेलच्या Principles of Mathematics मध्ये class ह्या किंवा वर्ग किंवा गट या कल्पनेला प्राधान्य दिले गेले होते व अंक या कल्पनेचे विश्लेषण class of all classes या तत्त्वानुसार करण्याचा प्रयत्न केला होता. तो प्रयत्न फसला, कारण त्यात विरोध डोकावला. हा विरोध डोकावण्याचे कारण असे की त्यावेळी रसेलने class या कल्पनेचे नीट विश्लेषण केलेले नव्हते. या कल्पनेचे नीट विश्लेषण न होण्याचे कारण म्हणजे त्यावेळपावेतो 'अर्थ' या शब्दाचा अर्थ काय याची नीटशी कल्पना रसेलला नव्हती. आपण व्यवहारात पुष्कळदा या वाक्यात अर्थ नाही, जीवन हे अर्थशून्य आहे, वगैरे वाक्प्रचार वापरतो; परंतु 'अर्थ' म्हणजे काय, त्या कल्पनेची व्याप्ती काय याची बऱ्याच जणांना जाणीव नसते. 'अर्थ' या कल्पनेचा अर्थ फार संदिग्ध आहे. एखादे विशेषनाम जर घेतले तर त्या विशेषनामाचा अर्थ जी वस्तू या विशेषनामाने निर्दिष्ट असेल ती. 'सॉक्रेटीस' हा शब्द सॉक्रेटीस ही वस्तु दाखवतो व म्हणून 'सॉक्रेटीस' या शब्दाचा अर्थ सॉक्रेटीस होतो. हा झाला नाम-वस्तू संबंध. परंतु जेव्हा आपण वाक्याचा अर्थ लावतो त्यावेळी वाक्याचा संबंध वस्तूशी Object-शी न येता वस्तुस्थितीशी किंवा Fact शी येतो. आता Fact म्हणजे वस्तु. Object नव्हे. आपण व्यवहारात वस्तू आणि वस्तुस्थिती याची गल्लत करतो. आपली कल्पना अशी असते की ज्याप्रमाणे या जगात वस्तू आहेत याचप्रमाणे facts आहेत. माझ्या टेबलावर दहा पुस्तके आहेत. या दहा वस्तू झाल्या. परंतु माझ्या टेबलावर दहा पुस्तके आहेत ही वस्तुस्थिती आहे. असे









जेव्हा आपण म्हणतो त्यावेळी वस्तुस्थिती म्हणजे निराळी वस्तू होत नाही. माझ्या टेबल.वर अकरा वस्तू होत नाहीत. वस्तू आणि वस्तुस्थिती यातला भेद अत्यंत महत्त्वाचा आहे. एखाद्या वस्तूला नाव देता येते; परंतु एखाद्या वस्तुस्थितीला नाव देता येत नाही. वस्तुस्थितीचा निर्देश केवळ वाक्याने होऊ शकतो. नावाने नव्हे. रसेलने जेव्हा class of classes ही कल्पना मांडली त्यावेळी वस्तू व वस्तुस्थिती यामधला भेद रसेलच्या लक्षात आला नव्हता. Class of all classes या कल्पनेत जेव्हा विरोध उत्पन्न होतो तेव्हा त्या विरोधाचे मूळ रसेलने class ही जणू एका विशिष्ट प्रकारची वस्तू आहे असा घेतला होता. आता रसेलच्या लक्षात आले की class ही काही विशिष्ट प्रकारची वस्तू नव्हे, की जिचा निर्देश class या नावाने होऊ शकेल. त्याच प्रमाणे जेव्हा आपण गणितशास्त्रात अंक किंवा Number या कल्पनेचा विचार करतो तेव्हा अंक म्हणजे एखादी विशिष्ट तऱ्हेची वस्तू नव्हे की त्या अंकाचे निदर्शन एखाद्या संख्येने व्हावे. जेव्हां आपण '७' हा आकडा numeral लिहून ७ या अंकाचा निर्देश करतो त्यावेळी या निर्देशनाचे Denoting चे विश्लेषण नामवस्तू या दृष्टीने न करता वाक्य–वस्तुस्थिती यानुसार करायला हवे त्याचप्रमाणे class चे विश्लेषण वाक्य–वस्तुस्थिती यानुसार करायला हवे होते. परंतु ज्यावेळी class ची कल्पना रसेलच्या मनात प्रामुख्याने घोळत होती त्यावेळी हा विचार रसेलला सुचला नव्हता. ज्यावेळी रसेलने On Denoting हा लेख लिहिला त्यावेळी विशेषनामाखेरीज ज्यावेळी आपण एखाद्या वाक्याचा किंवा वाक्यरचनेचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करतो त्यावेळी नामवस्तू या पद्धतीने त्याचा अर्थ न लावता वाक्य-वस्तुस्थिती अशा पद्धतीने तो लावायला पाहिजे असे रसेलला कळून चुकले. परंतु वाक्य म्हटले म्हणजे तिथे तर्कशास्त्र आलेच. त्याच-प्रमाणे वाक्य म्हटले म्हणजे अर्थ (meaning) आणि सत्यत्व (truth-value) असा भेदही पण आला. नाम-वस्तू या द्वंद्वात या भेदाला स्थान नाही. 'सॉक्रेटीस' या शब्दाचा अर्थ आणि सत्य म्हणजे सॉक्रेटीस. तर्कशास्त्र व गणितशास्त्र या दोन शास्त्रांमध्ये अर्थाला स्थान आहे तसे सत्यत्वाला स्थान नाही. गणितशास्त्राची प्रमेये वस्तुस्थितीशी ताडून पाहात नसतात. असे जरी असले तरी त्या प्रमेयात अर्थ नसतो असे कुणी मानीत नाही. गणितशास्त्राची सर्व प्रमेये जर वस्तुस्थितीशी ताडून त्यांचे सत्यत्व निश्चित करण्याचा प्रयत्न केला तर गणितशास्त्राला काहीच अर्थ राहाणार नाही.

## गणितशास्त्रात अर्थाला महत्त्व

गणितशास्त्रात अर्थाला महत्त्व आहे, सत्यत्वाला नव्हे. गणितशास्त्रातली अनंतत्वाची (Infinity) कल्पना सत्याच्या कसोटीवर कुणी घासून पाहाण्याचा प्रयत्न करीत नाही.तसे करणे हास्यास्पद होईल. अर्थ आणि सत्यत्व असा भेद करून या दोन कल्पनांची निरगाठ न बांधता या दोन कल्पना स्वतंत्र आहेत असे मान्य केले तरच तर्कशास्त्र व गणितशास्त्र या दोन्ही शास्त्रांची समस्या सुटेल, एरवी नाही,अशी रसेलची धारणा झाली.त्याचा Theory of Descriptions हा सिद्धांत याच कारणाकरता त्याने मांडला होता. व त्याच सिद्धांतानुसार गणितशास्त्राला तर्कशास्त्राचा आधार मिळेल, किंबहुना गणितशास्त्र म्हणजे तर्कशास्त्राचा एक विशिष्ट आविष्कार अशी रसेलची धारणा होती. याचे कारण वर सांगितल्याप्रमाणे ही दोन्ही शास्त्रे सत्याशी निगडीत नसून अर्थाशी निगडीत आहेत म्हणून. रसेलने आपला Principia Mathematica हा ग्रंथ A.N. Whitehead यांच्या सहकार्याने लिहिला त्यावेळी त्या ग्रंथाचा पाया गणितशास्त्र हे तर्कशास्त्राचे अंगभूत शास्त्र असा होता. केवळ तर्कशास्त्राच्या काही प्रमेयामधून गणितशास्त्राची सर्व अनुमाने बिनधोक काढता येतील अशी रसेलची महत्त्वाकांक्षा होती ही महत्त्वाकांक्षा कितपत फलद्रूप झाली व ती कितपत फलद्रूप होण्याची शक्यता आहे हा भाग अलाहिदा. मला स्वतःला असे वाटते की गणितशास्त्र हे तर्कशास्त्रापासून स्वतंत्र असून हे स्वातंत्र्य केवळ प्रमाणाचे (degrees) नसून प्रकाराचे (kind) आहे. याचे कारण असे की तर्कशास्त्र हे Syntax आहे तर गणितशास्त्राचा संबंध Semantics शी आहे. खरे म्हणजे तर्कशास्त्राचा संबंध अर्थाशी मुळीच नाही. तर्कशास्त्र हे अर्थ आणि सत्यत्व याच्या पलीकडचे आहे. म्हणूनच कांट याने तर्कशास्त्राला Transcendental असे म्हटले आहे. रसेलला Transcendental ही कल्पना मंजूर नव्हती. कारण त्याचे तत्त्वज्ञान दृग्वादित्वनिष्ठ (empirical) होते. कांटप्रमाणे परतत्त्वनिष्ठ (transcendent) नव्हते. कांटला अर्थ व सत्यत्व यांचा तर्कशास्त्रापासून संबंध तोडता आला. तसे करणे रसेलला शक्य नव्हते. याच कारणामुळे कांटला तर्कशास्त्र व गणितशास्त्र ही अलग करता आली. गणितशास्त्राचा संबंध सत्याशी जरी नसला तरी अर्थाशी आहे. तर्कशास्त्राचा संबंध सत्याशी नाही तसा अर्थाशीही पण नाही. तर्कशास्त्र Transcendental परंतु गणितशास्त्र Transcendental नव्हे; परंतु हा भेद रसेलला करणे शक्य नव्हते. याचा परिणाम असा झाला की रसेलला तर्कशास्त्रालासुद्धा अर्थाशी जुंपावे लागले व त्याचे पर्यवसान तर्कशास्त्र व गणितशास्त्र याचे अभेदत्व मान्य करण्यात झाले.

परंतु ही रसेलची सबंध विचारसरणी चूक होती व त्याचा परिणाम व्हायचा तोच झाला. Principica Mathematica हा ग्रंथ अथपासून इतीपर्यंत विसंगतीने भरगच्च भरलेला निघाला. याचे कारण त्या ग्रंथाचा पायाच मुळी कच्चा होता. गणितशास्त्राला तर्कशास्त्राचा भाग करणे ही पहिली चूक व तर्कशास्त्राला अर्थाच्या गाड्याला जुंपणे ही दुसरी चूक. या दोन्ही चुकांचे प्रायश्चित्त रसेलला मिळाले. हा पुढचा इतिहास फार मनोरंजक आहे व तत्त्वज्ञानाच्या अभ्यासकांना त्याच्यापासून बरेच शिकण्यासारखे आहे;

अनुक्रमणिका

परंतु या छोटयाशा लेखात त्याचा उहापोह करणे शक्य नाही. पाण्याच्या प्रचंड आवेगाने बांधाला भेगा पडाव्या तशी अवस्था या ग्रंथातील विधानांची झाली. एका भेगेला इथे पलिस्तर मारावे तर दुसरीकडे दुसरी भेग उपटलीच म्हणून समजावे. रसेलचे Theory of Types, Axiom of Reducibility हे सिद्धांत माझ्या म्हणण्याचा आशय स्पष्ट करतील. त्याचप्रमाणे रसेलची Propositional Function ही कल्पना. या कल्पनेशी निगडीत असलेल्या इतर कल्पना, उदाहरणार्थ Incomplete symbol, Meaning in use, Logical construction या सर्व कल्पना वादग्रस्त ठरल्या व या सर्व कल्पनांवर टीकेचे मोहोळ उठले. तात्पर्य काय की आपल्या Principia ग्रंथात गणितशास्त्राचा पाया भक्कम करण्याकरता रसेलने गणितशास्त्र हा तर्कशास्त्राचे एक अंगभूत भाग आहे असे सिद्ध करण्याचा जो प्रयत्न केला त्यामुळे कुणाचेच समाधान झाले नाही. आज तर स्थिती अशी आहे की रसेलच्या त्या विख्यात ग्रंथातला एकही सिद्धांत टिकून राहिला नाही. त्या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीत रसेलने स्वतः बरीच दुरुस्ती केली आहे. तरी पण त्याचा सैद्धांतिक अपुरेपणा जो राहिला तो राहिलाच. तो नाहीसा करायचा म्हटला म्हणजे रसेलने आपली तत्त्वज्ञानाची भूमिका आमूलाग्र बदलणे प्राप्त होते. व ते तर शक्य नव्हते. Wiener नावाच्या एका ग्रंथकाराने म्हटल्याप्रमाणे Principia मध्ये एका दृष्टीने पाहिले तर खूप तत्त्वज्ञान आहे, एका दृष्टीने पाहिले तर फारच कमी तत्त्वज्ञान आहे, व एका दृष्टीने पाहिले तर मुळीच तत्त्वज्ञान नाही. गणितशास्त्राचा पाया भरभक्कम करण्याची रसेलची महत्त्वाकांक्षा अशा तऱ्हेने अकार्यक्षम ठरली. Principia च्या लेखनाने रसेलच्या मेंदूवर भलताच ताण पडला व इथपर तो विषय सोडून द्यावा असे त्याने ठरवले व त्याने इतर विषयांकडे आपली दृष्टी वळवली. व त्या निश्चयानुसार त्याने Our Knowledge of the External World हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथात आपली logical construction ची कल्पना मांडली. बाह्य जगताचे ज्ञान मिळविण्यात व त्याची अंतिम रचना काय आहे हे समजून घेण्याचा प्रयत्न केला.

## तुरुंगवासात ग्रंथरचना

याच सुमारास युद्ध सुरू झाले व त्याच्या युद्धविषयक भूमिकेमुळे त्याला कैदेत ठेवण्यात आले. तिथे त्याने आपला Introduction to Mathematical Philosophy हा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ अत्यंत वाचनीय आहे. तसा तो वाटतो तितका सोपा नाही; परंतु आपल्या Principia चे तत्त्वज्ञान सोप्या व जिज्ञासूंना समजेल अशा शैलीत तो लिहिला आहे. ज्यांना रसेलचे गणितविषयक तत्त्वज्ञान कोणते हे समजून घ्यावयाचे असेल त्याने हा ग्रंथ समजून घेण्याचा प्रयत्न करावा. त्याच सुमारास म्हणजे तुरुंगातून सुटून आल्यानंतर त्याने Logical Atomism या विषयावर आठ व्याख्याने दिली. Logic [illegible] Knowledge या ग्रंथात ही व्याख्याने समाविष्ट केलेली आहेत. याच सुमारास रसेलच्या विचारात जबरदस्त क्रांती झाली. अगोदरच्या आपल्या सर्व ग्रंथात अर्थ या कल्पनेचे विवरण करताना आत्म[illegible] व [illegible]-data यांचे अस्तित्व रसेलने मान्य केले होते. W[illegible] J[illegible]s या प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञाला व तत्त्वज्ञान्याला आत्म्याचे अस्तित्व मान्य नव्हते. William James ने 'Does Consciousness Exist' असा लेख लिहिला होता. रसेलला James ची ही कल्पना मान्य नव्हती. आत्म्याचे स्वतंत्र अस्तित्व मान्य केल्याशिवाय 'अर्थ' या संज्ञेला काहीच अर्थ राहात नाही अशी रसेलची खात्री होती; परंतु १९११ साली त्याच्या विचारात क्रांती होऊन त्याने [illegible] प्रमाणे आत्म्याचे स्वतंत्र अस्तित्व अमान्य केले. त्याचप्रमाणे जड आणि चेतन यात केवळ प्रमाणाचा भेद आहे, प्रकाराचा नव्हे असेही त्याने प्रतिपादले. ही त्याची प्रतिक्रिया रसेलने आपला Analysis [illegible] Mind हा ग्रंथ लिहून प्रकट केली. तदनंतरचे रसेलचे महत्त्वाचे ग्रंथ म्हणजे An Enquiry into Meaning & Truth (1940), A History of Western Philosophy (1946), Human Knowledge, Its scope & Limits (1948) हे होत. ह्यात त्याचा पहिला म्हणजे Enquiry into Meaning & Truth Inquiry हा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. त्या ग्रंथात रसेलने अर्थ आणि सत्य यांचा परस्पर संबंध काय याचा विचार भाषेच्या अभ्यासाच्या दृष्टीने केला आहे. तात्त्विक विश्लेषण कसे असते व कसे असावे याचा हा ग्रंथ म्हणजे फार उत्कृष्ट असा नमुना आहे. भारतीय तत्त्वज्ञानाचा नगारा वेळोवेळी बडविणाऱ्यांनी तात्त्विक विचारांचा कोणत्या प्रकाराने विचार करायला पाहिजे हे या ग्रंथाच्या आधारे समजून येईल. आम्ही महाराष्ट्रातली माणसे टिळकांच्या गीतारहस्याचा तत्त्वज्ञानाचा उत्कृष्ट नमुना म्हणून उल्लेख करतो; परंतु टिळकांची विवेचन पद्धती किती ठिसूळ होती हे रसेलच्या या ग्रंथावरून मुख्यतः कळून येईल. तसे पाहिले तर रसेलचे सर्वच ग्रंथ विवेचन पद्धतीचे आदर्श आहेत. त्यातल्या त्यात हा ग्रंथ माझ्या मते सर्वोत्कृष्ट. दुसरे दोन ग्रंथ माझ्या मते बरेच निकृष्ट आहेत. त्यांचा पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या इतिहासावरचा वर उल्लेखिलेला ग्रंथ अत्यंत सामान्य आहे. पाश्चात्य तत्त्वज्ञान म्हणजे काय याचा सर्वंकष असा विचार त्यात केलेला नाही. रसेल जेव्हां स्वतंत्र विचार मांडतो तेव्हां ते विचार कितीही चूक असले तरी वाचनीय असतात; परंतु रसेल जेव्हां दुसऱ्या तत्त्वज्ञान्यासंबंधी लिहितात तेव्हां त्यांचे विचार पूर्वग्रहदूषित असतात. पाश्चात्य तत्त्वज्ञानावरचा ग्रंथ हा त्या दृष्टीने उपेक्षणीय आहे. कुणालाही तो ग्रंथ वाचण्याची मी शिफारस करणार नाही. त्याचा Human Knowledge वरचा ग्रंथ हा मागच्या विचारांची एका तऱ्हेने भेळपुरी आहे. त्यातील नावीन्य एवढेच की सर्व ज्ञान हे व्यक्तिगत असते कारण विचार डोक्यात असतात या आपत्तीतून सुटण्याकरता






रसेलने काही गृहीततत्त्वे Postulates मान्य केली व या तत्त्वांवरहुकूम आपणास व्यक्तीनिरपेक्ष ज्ञान होऊ देण्याची सोय केली. यालाच रसेल Non-demonstrative Inferences असे म्हणतो. या जगात कोणतेही सत्य निर्भेळ नसते, ज्याला आपण सत्य म्हणतो ते केवळ तरतमने (Probability) व्यापलेले असते असा त्याचा आता ग्रह झाला. लहानपणापासून निर्भेळ सत्य आपणास हस्तगत व्हावयाला पाहिजे अशी स्वप्न पाहाणारा रसेल निर्भेळ सत्य अस्तित्वात नाही अशा अवस्थेत येऊन पोचला. लहानपणची स्वप्ने भंग पावली. मोठेपणी अणुयुगापासून जे निरनिराळे प्रश्न उपस्थित झाले व जगाचे अस्तित्वच मुळी धोक्यात आले त्या परिस्थितीस तोंड कसे द्यायचे याचा विचार करण्यात त्याने आपली शक्ती खर्च केली. लहानपणची स्वप्ने तर गलीच. उलट भविष्यकाळच्या भीतीने उत्पन्न झालेल्या भ्रांतींनी रसेलचे आयुष्य झाकळले गेले व त्याची शांती व मानवतेवरचा विश्वास पार उडाला. त्याच्या आयुष्याची शोकांतिका झाली.

### रसेल... खरा ब्राम्हण

असा हा बर्ट्रांड रसेल. सबंध आयुष्य या गृहस्थाने ज्ञानसंपादनात वेचले. व तसे करताना एका क्षणाचीही उसंत घतली नाही. प्रत्येक विषयाचे त्याला आकर्षण. असा एकही विषय नाही की ज्याच्यावर मूलभूत असा विचार त्याने केला नाही व गडी तसाच दिलदार. प्रत्येक दोन दोन वर्षांनी आपली मते बदलायचा.परंतु या बदलण्यात त्याचा शुद्ध हेतू व प्रामाणिकपणा दिसून येतो. याची ज्ञानलालसा म्हणजे गंगौघ. त्यात कधी खंड नाही वा त्यात गढूळपणा नाही. सर्व काही स्वच्छ व निर्मळ. वित्गेंस्टाइन हा त्याचा विद्यार्थी. परंतु या विद्यार्थ्यापासून मी खूप शिकलो अशी कबुली देण्यात धन्यता मानणारा. खरे पाहिले असता ज्या रसेल घराण्यात हा जन्मला होता ते घराणे राजकारणात आघाडीवर होते. रसेलचे आजोबा हे एके काळी इंग्लंडचे मुख्य प्रधान होते. रसेलच्या आजीची इच्छा होती की रसेलने राजकारणात पडावे. तसे झाले असते तर रसेल कदाचित् इंग्लंडचा मुख्य प्रधान झाला असता. परंतु आजीच्या प्रयत्नांची कदर न करता या गृहस्थाने केंब्रिजमध्ये केवळ लेक्चरर, प्रोफेसरसुद्धा नव्हे, होण्यात धन्यता मानली व आपले सर्व आयुष्य विद्येच्या व्यासंगात घालवले. त्यांची मते, त्याने मांडलेले सिद्धांत, भग्नमूर्तीसारखे अस्ताव्यस्त पडले आहेत. रसेलचा असा एकही सिद्धांत नाही की ज्यांची आज चलती आहे. तर्कशास्त्रात त्याने क्रांती केलेली आहे अशी सामान्य समजूत; परंतु त्याचे तर्कशास्त्र व त्यावर आधारलेले गणितशास्त्र ही आज बेवारशी झालेली आहेत. असे जरी असले तरी रसेल ही व्यक्ती असामान्य होऊन गेली यात शंकाच नाही., केवढा प्रचंड प्रज्ञेचा हा मनुष्य. सर्व आयुष्य ज्ञानसाधनत घालवणारा. हा खरा ब्राह्मण. नाही तर आपल्याकडे ब्राह्मण म्हणविणारे व आपल्या ब्राह्मण्याचा टेंभा मिरविणारे थोडे का आहेत ? आपल्याकडे ब्राह्मण याचा अर्थ भिक्षुक. ब्राह्मणत्व आणि भिक्षुकी यात आम्ही भेद करीत नाही. ब्राह्मण हा तपस्वी असतो तर भिक्षुक हा याचनेवर जगतो. आम्ही सर्व जण याचक आहोत. भिक्षुकी हा आमचा व्यवसाय. हिंदुस्थानात खरा ब्राह्मण निपजणे शक्य नाही. कारण आपण पैसा व अधिकार याच्या मागे लागलेले भिक्षुक आहोत. आमच्या प्राध्यापकांची लायकी भिक्षुकांपेक्षा अधिक नाही. आमचे प्राध्यापक अधिक पगाराकरता मोर्चा काढतील, परंतु विद्यार्जनाकरता एक क्षण दवडणार नाहीत. प्राचार्यपदाकरता आमच्या प्राध्यापकांमध्ये हा क्यू लागलेला असतो. परंतु सदासर्वकाळ आपल्या विषयाचे चिंतन करणारा प्राध्यापक विरळा. आज सेनेटचा सभासद, उद्या सिंडिकेटचा सभासद, परीक्षक, पर्यवेक्षक, या सर्व उचापतीत आमच्या प्राध्यापकांचा वेळ खर्च होतो. कारण आम्ही जातीचे व हाडाचे भिक्षुक. परंतु रसेल हा भिक्षुक नव्हता तर ब्राह्मण होता. Principia Mathematica हा ग्रंथ हिंदुस्थानात लिहिला जाणे शक्य आहे काय ? आमचे राधाकृष्णन, रानडे वगैरे आधुनिक तत्त्वज्ञानी. केवळ उपनिषदांची पोपटपंची करून या महाभागांनी आपले पांडित्य गाजविलेले. रसेलचे कोणतेही पुस्तक घ्या व त्याने केलेल्या विश्लेषण पद्धतीचा विचार करा व आमची उपनिषदे, आमची गीता, आमची भाष्ये किती भुक्कड आहेत याचा पडताळा येईल. रसेलच्या तत्त्वज्ञान पद्धतीचा विचार केला म्हणजे आमचे झाडून जुने-जुने तत्त्वज्ञानी बोगस वाटतात. उपनिषदात काय तत्त्वज्ञान आहे ? गीतेत काय तत्त्वज्ञान आहे ? यात जर काय असेल घटपटाची लटपटपंची व बुवाबाजी. असे असून भारतीय तत्त्वज्ञान म्हणजे तत्त्वज्ञानाचा परमोत्कर्ष बिंदु, आमची आध्यात्मिक परंपरा म्हणजे जगाचा आदर्श असे म्हणावयाला आमचे तत्त्वज्ञानी म्हणवणारे बुवा तयार ! रसेलच्या तत्त्वज्ञानाचा जर आम्ही मनःपूर्वक अभ्यास केला तर खरा तत्त्वज्ञानी कसा असतो याची आम्हांला जाणीव होईल. नाही तर आमच्याकडे आहेतच रघुपतिराघव राजाराम, पतित पावन सीताराम म्हणत तत्त्वज्ञानाचा आव आणणारे बोकेसंन्यासी. म्हणे भारतीय तत्त्वज्ञान ! रसेलच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला म्हणजे भारतीय तत्त्वज्ञान ही निव्वळ भारतीय बुवाबाजी आहे याचा प्रत्यय येतो. असो !

वाचकांचा निरोप घेण्यापूर्वी मला त्यांची क्षमा मागायला हवी. हा लेख वाचून वाचकांची प्रतिक्रिया समाधानकारक असणे संभवनीय नाही याची मला जाणीव आहे; परंतु हा दोष केवळ माझा आहे. रसेलचे तत्त्वज्ञान मराठीत आणणे म्हणजे गगनाला गवसणी घालण्यासारखे आहे. माझा हा प्रयत्न यशस्वी झाला नाही, कदापि होणार नाही याची मला जाणीव आहे. श्री. दलाल यांच्या आग्रहामुळे मी हा लेख लिहावयाला लेखणी हातात धरली याचे कारण एकच व ते म्हणजे यातापातिरेकाने का होईना कुणी तरी वाचक रसेलचे ग्रंथ वाचायला उद्युक्त होईल. रसेलच्या नावाने थापा मारणारे फार आहेत; परंतु रसेलचे ग्रंथ वाचणारे फार कमी. माझ्या या लेखामुळे बेचैन होऊन, प्रभावित होऊन नव्हे, तर एखादा वाचक रसेलचे तत्त्वज्ञान उमजून घेण्याचा प्रयत्न करू लागला तर या सर्वस्वी असमाधानकारक अशा लेखाचे सार्थक होईल.

• • •

अनुक्रमणिका

